व्सेवोलोद विश्नेवस्की



# आशावादी शोकांतिका

व्सेवोलोद
विश्नेवस्की

# आशावादी शोकांतिका

## तीन अंकी नाटक

---

---



रादुगा प्रकाशन
मॉस्को

अनुवाद : अनिल हवालदार
सजावट : यू० स्कोवरदनीकोव

**Всеволод Вишневский**
ОПТИМИСТИЧЕСКАЯ ТРАГЕДИЯ

*на языке маратхи*

**V. Vishnevsky**
AN OPTIMISTIC TRAGEDY
A PLAY
*in Marathi*


सोविएत संघात मुद्रित

ISBN 5-05-000231-1

लाल सेनेच्या १५ व्या
वर्धापन-दिनानिमित्त

# पात्रे

**पहिला निवेदक**.
**दुसरा निवेदक**.
**वायनोनेन** – फिन्लंडचा खलाशी, कम्युनिस्ट.
**देवीचे वणवाला**.
**अलेक्सेय** – बाल्तिक नाविक काफल्यातील खलाशी, प्रथम दर्जा.
**नायक** – अराजकवाद्यांच्या गटाचा प्रमुख.
**महिला-कमिस्सार** – पक्षातर्फे बाल्तिक काफल्याकडे पाठवलेली.
**बोटीचा कमांडर** – माजी नाविक अधिकारी.
**घोगरा**.
**पहिला कनिष्ठ अधिकारी**.
**दुसरा कनिष्ठ अधिकारी**.
**तांडेल**.
**बँडमास्तर**.
**म्हातारी**.
**उंच खलाशी**.
**पहिला ऑफिसर**, मायभूमीला परतणारा.
**दुसरा ऑफिसर**.
**पुढारी, अराजकवाद्यांच्या कुमकेचा**.

**ओदेस्सावाला.**

**अधिकारी, शत्रूसेनेचा.**

**पाद्री.**

बाल्तिक नाविक काफल्याचे खलाशी, त्यांना निरोपदेणाऱ्या स्त्रिया, श्वेतरक्षक आणि इतर.

यादवी युद्धाच्या काळात बाल्तिक काफल्यामध्ये आणि युद्धआघाडीवर नाटकातील प्रसंग घडतात.

संगीताने आरंभ. जबरदस्त सामर्थ्य व्यक्त करणारे आणि शोक प्रकट करणारे सूर. काळीज भेदून जाणाऱ्या आणि जीव घुसमटून टाकणाऱ्या उन्माददायी सुरांचा कल्लोळ. मानवी प्रयत्नांचे ध्वनी आणि शोकाकुल आरोळी "कशासाठी ?" उत्तरांसाठी आकांताची धडपड आणि त्यांचा शोध. बाल्तिक काफल्यात आम्ही पंचाऐंशी हजार खलाशी होतो आणि कृष्णसागरी काफल्यात चाळीस हजार खलाशी होतो. आम्हीसुद्धा उत्तरांचा शोध घेत होतो. त्यांच्या-पैकी हा दोघांचा संवाद.

**पहिला** (शोकांतिका पहायला आलेल्यांना न्याहाळत) – हे कोण आहेत ?

**दुसरा** – प्रेक्षक. आपले वारस. आपला भविष्यकाळ. तुला आठवतं, ह्या भविष्यकाळासाठी एकेकाळी आपण बोटींवर आसुसलो होतो.

**पहिला** – प्रत्यक्ष अस्तित्वात आलेल्या भविष्यकाळाला पाहण्यात मजा आहे. इथं जवळजवळ दीडहजार आपल्याला पहात आहेत... त्यांनी खलाशी कधी पाहिले नाहीत ?

**दुसरा** – गप्प बसलेत. वीर-पराक्रम पहायला, वीरांना पहायला आलेत.

**पहिला** – तर मग त्यांनी एकमेकांकडं पाहणं जास्त बरं !

**दुसरा** – किती लीन शांतता ! कुणी उठून काहीतरी बोलत का नाही ? (प्रेक्षकांमधील कुणालातरी उद्देशून.) अहो कॉम्रेड, तुमच्या कपाळाला आठ्या पडलेल्या दिसतात. जणू म्हणायचंय, ही रिक्रूट-कचेरी नाही, तर रंगभूमी आहे... कदाचित तुम्हाला वाटत असेल की, चालू परिस्थितीत रिक्रूट-कचेरी आणि रंगभूमी यांचे भिन्न उद्देश

आहेत? अस्सं, तुम्हाला तसं वाटत नाही... ठीक आहे, सुरू करू! (कवितेला आरंभ करण्याच्या थाटात.) आज रात्रीची सारी कामं बाजूला ठेवा. अखेरपर्यंतची वाटचाल पूर्ण केलेली खलाशांची रेजिमेंट आता तुमच्याशी बोलतेय–आपल्या वारसांशी!

प्रचंड गडगडाट करीत चिलखती पत्रे सावकाश उलगडत जातात. आकाशात एकही ढग नसलेला प्रखर तेजस्वी दिवस. उत्तरेकडील माणसांच्या डोळयांना त्याचे तेज सहन होत नाही. जमिनीवरील प्रत्येक गोष्ट ठळकपणे उठून दिसतेय. प्राचीन रस्त्यावरून रेजिमेंट चालतेय. तेजस्वीपणा वाढतो, कारण रेजिमेंटचा गणवेष पांढरा आहे. तिचे सैनिक रंगभूमीच्या मागील भागात चालत जातात आणि प्रेक्षकांसमोर एका प्रचंड गानवृंदाच्या रचनेत उभे राहतात.

**दुसरा** (हा गानवृंदाचा प्रमुखही आहे).–ह्या माणसांपैकी प्रत्येकाचं कुटुंब होतं. प्रत्येकाची बायको होती. बायकांनी ह्या माणसांवर प्रेम केलं. त्यांच्यापैकी अनेकांना मुलं होती. ती मुलं आज इथं आहेत. त्यांच्यापैकी प्रत्येकात भावी पिढीच्या निर्मितीची घडण होती. पंधरा वर्षांपूर्वी ती अंधुक होती. आता ती ठळक झालीय–ही नवी पिढी. इथं आलेल्या नव्या पिढीला आमचा नमस्कार. ह्या लढवय्यांनी कधीही अपेक्षा ठेवल्या नाहीत की, त्यांच्या मृत्यूंचा तुम्ही शोक करावा. आणि महान यादवी युद्धाच्या काळात लढवय्यांच्या अनेक सेना धारातीर्थी पडल्या म्हणून तुमच्या धमन्यांमधून रक्त वाहायचं थांबलं नाही. जीवन कधी मरत नाही. सग्यासोयऱ्यांच्या थडग्यांपाशी हसतखेळत खाणं लोकांना जमतं. आणि हे छान आहे! "उल्हसित रहा!" मरणाऱ्या योद्ध्यांनी सांगितलं. "हे क्रांती, आनंदी नजरेनं पहा!" मी म्हटल्याप्रमाणं, रेजिमेंट आपल्या वारसांना उद्देशून बोलतेय. तुम्हाला श्राद्धांच्या विधींमधून

ती मुक्त करतेय. मूकपणं तुम्ही विचार करा -- लढा आणि मरण यांना आमच्या दृष्टीनं काय अर्थ होता याचा शोध घ्या. तर आरंभ असा झाला होता...

प्रकाश अंधुक होतो. सायंकालीन छाया उबदार वातावरण निर्माण करतात. त्या स्तब्धतेत असीम मानवी तळमळ जाणवते. ती फक्त संगीताद्वारे व्यक्त होऊ शकते. रेजिमेंटच्या रांगांमधून पहिला, दुसरा, तिसरा रेजिमेंटचा इतिहास सांगू लागतात. छोटचा चणीचा फिन् **वायनोनेन** सुरुवात करतो.

**वायनोनेन** – संध्याकाळची वेळ आणि एकाकी खलाशाला मायेचा शब्द बोलणारं जवळपास कुणीही नाही.

त्याच्या बोलण्यातील परकी हेल आणि काहीही कारण नसताना, भोवतालच्या प्रगाढ खिन्न शांततेच्या जाणीवेने त्याच्या डोळ्यां-मधून वाहणारे पाणी, त्याची दाट निराशा, ह्यांमुळे अंतःकरण हेलावते.

**आवाज** – हु... श्शार!.. अंगठे फाकवा, टाचा जुळवा! रायफलच्या दस्त्याएवढं अंतर. रांगा करा! खांदे ताठ!

छोटा फिन् वास्तवात परततो.

**वायनोनेन** – कुणा अक्करमाशाच्या टाळक्यात जुन्या राजवटीच्या सवयी अजून बसल्यात? (जेथून आरोळी आली त्या दिशेने डोळे वटारून पाहतो.) पुरे करा! तीनशे वर्षांत वीट आलाय!

**आवाज** – बाये से... आगे चल!

**वायनोनेन** – अरे, वीट आला म्हणतो ना, सैताना!

**देवीचे वणवाला खलाशी** त्याला शांतपणे समजावतो.

**देवीचे वणवाला** – तू उगीच भडकू नकोस... लक्ष देऊ नकोस...

तो अलेक्सेय स्वत:शी बडबडतोय ... त्याला तळमळ सहन होत नाही म्हणून.

**आवाज** – दाया-बाया, उजवा-डावा!

**वायनोनेन** – सैताना! इथं आधीच आम्ही तळमळीनं कासावीस बनलोय!

बाल्तिक काफल्यातील प्रथम दर्जाचा खलाशी अलेक्सेय शांतपणे पुढे येतो.

**अलेक्सेय** – वायनोनेन ... कंटाळलास? तुला खुलवायचा माझा इरादा होता ... पण तू अजून संतापलेला?

छोटा फिन् त्याचे बोलणे ऐकून आठ इंची फिन् सुऱ्याने टेबल खरवडू लागतो.

**वायनोनेन** – चांगलं नाही.

**अलेक्सेय** – काय चांगलं नाही?

**वायनोनेन** – कॉम्रेडना अस्वस्थ करणं, त्यांना छळणं ...

**अलेक्सेय** – का चांगलं नाही? एकूण चांगलं काय आहे? पूर्ण अर्थ सापडलाय तुला?

**वायनोनेन** – तत्त्वज्ञानी बनलास?

**अलेक्सेय** – नाही, तू मला समजावून सांग, चांगलं म्हणजे काय? (**तीक्ष्णपणे.**) मला पूर्वी नियमांमध्ये लिहिल्याप्रमाणं माहीत होतं: चाकरी बजावणं चांगलं, आई-बापांचा आदर करणं चांगलं, तुमच्या भावी बायकोवर प्रेम असणं चांगलं, देवाची प्रार्थना करणं चांगलं ... सारं काही स्पष्ट होतं. सर्व काही शांत-निवांत होतं आणि मी पहिल्या दर्जाचा खलाशी होतो. आणि खलाशी असणंसुद्धा चांगलं होतं. पण आता? आता काय चांगलं?

**देवीचे वणवाला** – अरे तुला काय झालंय?

**अलेक्सेय** – सत्याचा शोध घेतोय!

**देवीचे वणवाला** – असा शोध घेणारा तू काही पहिला नव्हेस!

**अलेक्सेय** – मीसुद्धा यातना भोगतोय, विचार करतोय, कंटाळ्यापायी दारू पितोय, चैन करतोय आणि रात्री जीवनाबद्दल बोलतोय... नाही, तू मला सांग, आता चांगलं म्हणजे काय?

**वायनोनेन** – नंतर, आणखी काही वर्षांनंतर. तेव्हा चांगलं होईल. म्हणून सगळी माणसं आपापल्या जागांवरून उठली आहेत.

**अलेक्सेय** – सगळ्यांचं चांगलं होईल? बायबलमध्ये लिहिलंय तसं सगळं घडेल? मला निदान एकदा तरी ते 'आहे' असं पहायचंय – काय घडेल ते नको, पण प्रत्यक्ष 'घडलेलं!' समजलं? उगाच सगळे भविष्यकाळाच्या बाता मारतात... बरं ठीक आहे, मान्य करतो की सगळ्यांचं चांगलं होईल. पण आत्ता ज्यांना ठार मारताहेत त्यांचं काय?

**वायनोनेन** – त्यांची चिरंतन आठवण राहील.

**अलेक्सेय** – धन्यवाद, सांत्वनाबद्दल!

**वायनोनेन** – ह्यात थट्टा करण्यासारखं मुळीच काही नाही. तू मूर्ख आहेस!.. जो मरायचा तो मरणारच, पण निदान पहिल्यांदाच माणसासारखा मरेल! नाही तर कत्तल केलेल्या मासासारखं, दोन कोपेकला एक वाटा...

**अलेक्सेय** – बरं, बरं, समजलं. आता पुरे. तर चांगलं होणार म्हणतोस?

**वायनोनेन** – अगदी नक्की! (काहीशा अधिक शांतपणे तो हे शब्द उच्चारतो, पण तरीही त्यात आवेग आणि उपहास जाणवतो.)

**अलेक्सेय** – अस्सं... म्हणजे सुखासाठी पुढं लोक धडपडणार नाहीत? असंच ना? मानवजात पोचली स्वतःच्या मुक्कामाला. उतरा खाली

बंदराचं नांव – भविष्यकाळ ! .. त्याला पाय लावून बघता येईल ?

**देवीचे वणवाला** – आपण नाही तिथवर जाऊ शकलो तरी दुसरी माणसं उतरतील !

**अलेक्सेय** – छ्याः ! माणूस कुठंही पोचणार नाही ! नुसता प्रवास करत राहणार ! ना आपण कुठं पोचणार, ना आणखी कुणी ! ह्या जगात न थांबता माणूस जगत राहतो. कुणीही, कधीही शेवटच्या मुक्कामाला पोहोचलेला नाही ! हा शोध मी लावलाय, नौदलातला खलाशी अलेक्सेय ह्यानं ! लिही ! (जातो.)

**देवीचे वणवाला** – त्याच्याशी वाद घालणं अशक्य !

**वायनोनेन** – एक दिवस भेटेल त्याला कुणी सवाई !

**देवीचे वणवाला** – तो कुठचा ?

**वायनोनेन** – प्रशांत महासागरातला. तो अमेरिकेत गेला होता, बराच समुद्रप्रवास केलाय !

**देवीचे वणवाला** – आयुष्याबद्दल विचार करतो.

**वायनोनेन** (तिटकाऱ्याने.) – अराजकवादी !

छोटा फिन् स्तब्ध बसून राहतो. संधिप्रकाशात **खलाशी** उदास चेहऱ्यांनी फिरतात. कुणीतरी एक करुण गीत गातोय. ते गीत बोटीच्या बंबात कोळसे भरणाऱ्याबद्दल आहे – ... "माझ्या भट्टीत आग मुळीच नाही पेटत, नाही उरली वाफ माझ्या बंबात ..."

**अलेक्सेय** धावत येतो. त्याला पाहताच एकदम स्तब्धता पसरते.

**अलेक्सेय** (तिटकाऱ्याने आणि संतापाने.) – नौदलातले खलाशी ! अराजकवादी ! धोका !

**वायनोनेन** – कुठं ? काय ?

**उंच खलाशी** – धोका ?

**देवीचे वणवाला** – सावधान !

त्याच्या इशाऱ्यासरशी सर्वांची कुजबूज सुरू होते. अलेक्सेयभोवती माणसे गोळा होतात आणि प्रश्न विचारू लागतात: "कुठं, काय, कोण ?"

**अलेक्सेय** ( सर्वांकडे पाठ करून, गंभीरपणे. ) – आपल्यावर कमिस्सारची नेमणूक झालीय !

**उंच खलाशी** – केव्हाच व्हायला पाहिजे होती !

**वायनोनेन** – आता तुला तो आयुष्याचा अर्थ समजावून सांगील.

तणावलेल्या मन:स्थितीमधील जमावातून कुणीतरी ओरडतो: "म्हणजे इत:पर आमच्यावर विश्वास नाही ?" लोक एव्हाना बळींना बघतात आणि प्रहारांच्या अपेक्षेने शरीरे दबकू लागतात. अचानक गोंगाट आणि तणाव कमी होऊ लागतात... माणसांमध्ये बदल घडतो व ती अधिकाधिक शांत होतात. जमाव मागे मागे सरतो आणि विस्कळीत बनतो. जांभळट-तांबडया चेहऱ्याचा एक धिप्पाड केसाळ माणूस पुढे पुढे येतो. त्याच्या व्यक्तिमत्त्वात अधिकाराची जरब आहे. हा – **नायक**. त्या स्तब्धतेत त्याचा प्रश्न सावकाशपणे आणि खालच्या पट्टीत उमटतो.

**नायक** – कशाबद्दल गोंगाट चाललाय ?

**घोगरा** ( नायकाचा मदतनीस ) – उत्तर द्या !

**अलेक्सेय** – आपल्यावर कमिस्सारची नेमणूक झालीय.

**नायक** – उगीच का बोंब मारतोस ? कुठल्या पक्षाचा आहे ?

**अलेक्सेय** – सरकारी. बोल्शेविकांच्या.

**नायक** – रुळेल ! आपण वठणीवर आणू !

पुरुषांच्या त्या मूक, तणावलेल्या जमावाकडे कुठूनतरी एक **स्त्री**

येते. त्या क्षणी तिचे आगमन विचित्र, अशक्य आणि रूढ नियमांच्या विरुद्ध भासते. त्या खलाशांच्या जाडयाभरडया, उर्मट आवाजांमधल्या पहिल्याच प्रश्नांपासून त्या महिलेचे कधीही भरून न येणारे असे काहीतरी भयानक नुकसान होणार, असे वाटते. तिला सर्वजण रोखून पाहतात, पण प्रश्न विचारीत नाहीत.

**अलेक्सेय** – मी सल्ला दिला असता की ह्या कमिस्सारला ...
**नायक** – मी सल्ला देईन की, कुणीही मला सल्ला देऊ नये!

स्तब्धता.

निष्कारण ओरडतोस.

त्या जमावात मुख्य कोण हे जाणून ती स्त्री नायकापाशी जाते आणि त्याच्या हाती कागद देते. नायक वाचतो, बाईकडे निरखून पाहतो आणि परत वाचतो.

तर तुम्ही आमच्या कमिस्सार?

मान डोलावून ती स्त्री सूचित करते की, सर्व काही स्पष्ट झाले आहे आणि त्या प्रश्नावर चर्चा करण्याचे कारण नाही. आत्तापर्यंत वाचा बसलेल्या जमावातून कुणीतरी चकित उद्गाराला तोंड उघडतो ...

**आवाज** – पण ...

नायक आपल्या हाताने सावकाशपणे त्या खलाशाचे तोंड मिटतो.

**नायक** – तुम्ही सोशल-डेमोक्रॅट, बोल्शेविक?
**स्त्री** – हो.

**नायक** – बऱ्याच काळापासून ?

**स्त्री** – एकोणीसशे सोळापासून.

**नायक** – एकत्र रहायचा प्रयत्न करू. तुमची व्यवस्था लावून घ्या आणि कामाला लागा ... ( जवळ येणाऱ्या खलाशांना ) अडथळा आणू नका !

स्त्रीकडे वळून वळून बघत माणसे हळूहळू पांगतात.

अं ... तुम्हाला मदत पाहिजे ?.. सामान उचलायला ..?

**देवीचे वणवाला** – आता आमच्यापाशी हमाल नाहीत !

**स्त्री** – मी स्वत: उचलीन माझं सामान.

ती एकटी उरते. शांतता. चकित वातावरण. प्रवेशद्वारापाशी नवीन **माणूस**. झारच्या नौदलातील तो अधिकारी असल्याचे ताबडतोब ध्यानात येते. तो काहीसा आश्चर्यात आहे आणि काय घडले ते त्याला माहीत नाहीं. स्त्रीला पाहताच तो तिच्या मदतीला धावतो.

**कमांडर** – मी आपल्याला मदत करू ? ( तिची छोटी पेटी उचलतो. ही स्त्री इथे कशी काय आणि कोण म्हणून आली, ह्याबद्दल त्याला कुतूहल वाटते. खालच्या आवाजात. ) ह्या बोटीच्या कुणा अधिकाऱ्याला भेटायला तुम्ही आलात काय ?

**स्त्री** – मी ...

**कमांडर** ( झुकून. ) – लेफ्टनंट बेरींग. ( काहीशा सलगीच्या आणि चकित सुरात. ) इथं कमांडर म्हणून माझी नेमणूक झालीय. ( तो टोपी काढतो आणि जवळजवळ जबरीनेच तिचा हात खेचून त्या हाताचे चुंबन घेतो. )

**स्त्री** – मी इथली कमिस्सार म्हणून आलेय ! जुन्या सवयी विसरून जा !

ती सहज – अधिकाराच्या स्वरात बोलते. ह्या अनपेक्षित धक्क्याकडे कमांडर दुर्लक्ष करतो. तो सावकाशपणे स्वतःला सावरतो, डोक्यावर टोपी ठेवतो आणि इच्छेपेक्षा केवळ सवयीपायी सलाम ठोकतो. त्याने आरंभी ज्या आदबशीर स्वरात संभाषणाला सुरुवात केली होती, त्यापासून कितीतरी दूर अशा आवाजात तो बोलू लागतो...

**कमांडर** – माझ्यावर सोपवलेल्या जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी मी इथं हजर झालोय. नौदल अधिकारी बेरींग.

पार्श्वभूमीवर कुठेतरी काहीतरी संकट निर्माण झाल्याच्या गोंगाटाचा आवाज ऐकून दोघेही त्या दिशेने पाहतात. हातात सुरा घेतलेला छोटा **फिन्** कुणापासून तरी मागे मागे सरकतोय. अद्याप न दिसणाऱ्या लोकांना उद्देशून तो घुसमटल्या आवाजात बोलतोय.

**वायनोनेन** – हिंमत करू नका... खबरदार! (स्त्रीकडे बोट दाखवून.) तुला हीसुद्धा पाहिजे? सैताना...

त्याच्यापाशी दोन माणसे नजीक येतात – एक आहे **अलेक्सेय** आणि दुसरा धिप्पाड केसाळ **खलाशी**. केवळ डोळ्यांनी आणि ओठांनी दटावून ते त्या फिन्‌ला गप्प करू पाहतात. हातात सुरा धरून फिन् थेट बाईच्या पुढ्यात थांबतो. दोघेजण अजूनही पुढे सरकत असतात.

आम्ही तुम्हाला तसं सोडणार नाही!

मदतीसाठी फिन् धावतो. बाई सावधपणे उभी राहते.

**कमांडर** – तुमची काही राजकीय कामं आहेत? मी आपली रजा घेऊ शकतो काय?

**अलेक्सेय** कमांडरकडे पूर्ण दुर्लक्ष करतो. त्याला तो तुच्छ लेखतो. स्त्रीपाशी येत तो म्हणतो...

**अलेक्सेय** – अहो कॉम्रेड, चला, आपण लग्न करू! एवढं आश्चर्य कशाचं वाटतं? प्रेम म्हणजे एक उदात्त कार्य! आपला वंश वाढवू आणि एकत्रपणं थोडी बेभान मजा भोगू!

**कमांडर** – इथं काय चाललंय? (खलाशाला.) अहो, तुम्ही ऐका...!

**कमिस्सार** – कॉम्रेड कमांडर, तुम्ही जा. आम्ही इथं आमच्यात चर्चा करू. कॉम्रेडला लग्नाच्या प्रश्नाबाबत कुतूहल आहे.

गोंधळलेला माजी नौदल **अधिकारी** आज्ञाधारकपणे निघून जातो.

**अलेक्सेय** – मी परत बोलतो, केंद्राकडून आलेल्या कॉम्रेड प्रतिनिधी, आपण इथल्याइथं व्यभिचार करू या! लौकर आटपा, कारण दुसरा एव्हाना वाट पाहतोय आणि आम्ही इथं खूपजण आहोत.

कमिस्सारला त्याच्या शब्दांचा अर्थ फारसा उमगत नाही, पण परिस्थितीचा अर्थ समजतो. पुरुषांच्या प्रत्येक हालचालीला तिच्याकडून अस्पष्ट प्रतिक्रिया उमटते.

तर मग?

अस्पष्ट अंधारात सर्व दिशांनी **अराजकवादी** येतात.

**दुसरा** (कमिस्सारला.) – "नीलपुष्पीच्या घमघमत्या डहाळीखाली, कडकडून तुझं चुंबन घेईन..."

जमावातून घुसमटलेला हशा.

गरजवंताची गरज पुरी कर... तर मग! ए बाई!

**तिसरा** – अरे, तुम्ही लौकर आटपता ना? (हातात चादर घेऊन

येतो . ) बघतेस काय ? झोप .

**कमिस्सार** – कॉम्रेडहो ...

**अलेक्सेय** – बिनउकळलेलं पाणी पिऊ नका !

**कमिस्सार** – कॉम्रेडहो ...

**दुसरा खलाशी** ( दटावून . ) – तू कुणापाशी आलीस असं वाटतं ? आँ ?

**अंगभर गोंदलेली एक महाकाय अर्धनग्न व्यक्ती** अनपेक्षितपणे तेथे अवतरते . स्तब्धता .

**कमिस्सार** – तुम्ही थट्टा करताय ? माझी कसोटी पाहताय ?

**अर्धनग्न खलाशी** – आम्ही थट्टा करत नाही . ( तो एकदम बाईकडे झेपावतो . )

**कमिस्सार** – आम्हीसुद्धा थट्टा करत नाही !

आणि कमिस्सारच्या रिवॉल्वरमधली गोळी त्या अर्धनग्न खलाशाच्या पोटात घुसते . बाकी खलाशी एकदम मागे सरकतात .

तर, आणखी कुणाला कमिस्सारच्या शरीराचा अनुभव घ्यायचाय ? तुला ? ( दुसऱ्याला . ) तुला ? ( तिसऱ्याला . ) तुला ? ( त्या परिस्थितीत कसे वागायचे ह्याचा तात्काळ निर्णय घेते व प्रतिप्रहार टाळण्यासाठी हातात रिवॉल्वर धरून खलाशांच्या दिशेने पुढे पाऊल टाकते . ) नाहीत कुणी ? का बरं असं ? ( ती स्वत:ला आवरते आणि छातीमधील धडधड कमी होण्यापुरता अवधी घेऊन पुढे बोलते . ) आता ऐका . जेव्हा मला गरज वाटेल – मी एक पूर्ण निरोगी स्त्री आहे – तेव्हा माझी मी ती गरज भागवण्याची व्यवस्था करीन . पण त्यासाठी तरण्या शिंगरांच्या आख्ख्या कळपाची मुळीच जरूरी नाही .

**देवीचे वणवाला** ( अर्धवट ओशाळे हसत . ) – हे मात्र खरं ...

**वायनोनेन** धावत येतो. त्याच्यासोबत **उंच खलाशी**, एक **म्हातारा खलाशी** व आणखी **दोघे** आहेत.

**वायनोनेन** – जरा धीर धर कमिस्सार... आम्ही आलोच.
**कमिस्सार** – इथं सर्व गोष्टींचा एव्हाना निर्णय लागलाय.

जमाव वळतो. परत शांतता. **नायक** येतो. तो सावकाशपणे चालतो. सर्व गप्प. नजरांची सूचक देवघेव. प्रेतावर नजरेचा एक कटाक्ष. नायक काही न बोलता प्रेताला एक लाथ मारतो. प्रेत शिडीवरून गडगडत धप्पदिशी खाली पडते. नायक कमिस्सारकडे पाहतो.

**नायक** – त्याला क्षमा करा... रांगडे वागतात, काय करणार?
**अलेक्सेय** – चला.

**कमिस्सार** – कम्युनिस्ट पक्षाचे सभासद आणि सहानुभूतीदारांनी थांबावं.

**घोगरा** (ताबडतोब.) – त्याला परवानगी नाही. आपल्या सगळ्या बैठका सामायिक असल्या पाहिजेत. (शब्द वाया न घालवता, कमिस्सारच्या आवाहनानुसार थांबलेल्या लोकांच्या दिशेने तो पुढे सरकतो. चेहऱ्यावर उपरोधिक आणि तिटकाऱ्याचा भाव धारण केलेल्या उंच खलाशाला उद्देशून.) तू त्यांचा सहानुभूतीदार काय?

**उंच खलाशी** – आणि मी एकटाच नव्हे.

घोगरा आणि त्याचा मदतनीस जमावाला मागे रेटतात. एकटा छोटा फिन् निग्रहाने थांबतो. शेवटी त्या प्रचंड रिकाम्या जागेत तो एकटा उरतो.

**कमिस्सार** – तू एकटा?
**वायनोनेन** – आणि तू एकटी, कमिस्सार?

**कमिस्सार** – आणि पक्ष ?

**रेजिमेंटचे कनिष्ठ अधिकारी** येतात.

**पहिला कनिष्ठ अधिकारी** – तुम्हा प्रत्येकाला मी विचारतो: त्या काळात लाल सेनेत आणि नौदलात किती कम्युनिस्ट होते ह्याची तुम्हाला आठवण आहे?.. आठवा बघू, भाग घेतलेल्यांनो!..

स्तब्धता.

दोन लाख ऐंशी हजार. अर्धा पक्ष. दर दोनपैकी एक कम्युनिस्ट युद्धआघाडीवर आग झेलत होता. उरलेला प्रत्येक कम्युनिस्ट शहरां-मधून, स्तेपमधून, जंगलांमधून आगीला तोंड देत होता. कारण वर्ग-युद्धात पिछाडी नसते. घायाळ कम्युनिस्टांच्या यादीत व्लादीमिर लेनिन यांचा समावेश होता आणि ठार झालेल्यात – वोलोदार्स्की, ऊरीत्स्की, सव्वीस कमिस्सार, कत्तल झालेल्या संपूर्ण गुबेर्निया * समित्या आणि संघटना. पण म्हणून पक्ष आडखळला?

**दुसरा कनिष्ठ अधिकारी** – अशा पक्षाला कसं थोपवून धरणार अथवा अडथळा आणणार? सशस्त्र, धीट, लवचिक पक्षाला? सबंध वर्गाला जागृती आणलेल्या पक्षाला? एका देशाची उभारणी करणाऱ्या, मानवतेमधल्या सर्वोत्तम घटकांच्या एका महाप्रचंड छावणीची उभारणी करणाऱ्या पक्षाला? रक्तपाती आणि रक्तपातविरहित संघर्षात, हिंसक आणि शांततावादी संघर्षात, जुन्या जगातल्या सर्व शक्तींविरुद्धच्या संघर्षात, कामगारवर्गीय निर्धाराचं ऐक्य निर्माण करणाऱ्या पक्षाला!

---

* गुबेर्निया – प्रांत.

स्तब्धता.

अशा पक्षाला विरोध करण्याचा प्रयत्न करणाऱ्याला, आमच्या देशाविरुद्ध जाणाऱ्याला आम्ही नष्ट करू, धुळीत मिळवू!

जागा मोकळी. **नायक** येतो. त्याच्या पाठोपाठ **घोगरा** आणि **अलेक्सेय**. दडपणारी शांतता. सावधता.

**अलेक्सेय** – तिच्याभोवती सहानुभूतीदार गोळा व्हायला लागलेत...

**घोगरा** – त्यांना नाहीसं करू... श्शू ऽऽ... फिन् येतोय. (येणाऱ्या फिन्ला उद्देशून.) ए पक्षाच्या सभासदा, इकडं ये.

**वायनोनेन** – येतो. तुझा स्वर्गीय आवाज ऐकायला मला फार आवडतं. "गा, यक्षा, लाजू नको!"

**घोगरा** (संयम राखून.) – काय सांगितलं तिनं तुला?

**वायनोनेन** (आव्हानपूर्वक.) – खूप सांगितलं! (हसऱ्या चेहऱ्याने सावकाशपणे निघून जातो. त्यांचा पावलांचा आवाज विरतो.)

**अलेक्सेय** – अतर्क्य बाई!

**घोगरा** – तिचे तुकडे करून कुत्र्याला खायला घाला.

**नायक** – चूप रहा तू!

स्तब्धता.

आता तिला कोण हात लावील? (निर्णायक हातवारा.) "तुकडे करा!" दुसऱ्याला पाठवतील. समजत नाही? (विचारात गढतो.) ही सर्वांना आवडलीय. ही बाई आपल्या दृष्टीनं फार मोलाची आहे.

**अलेक्सेय** – फार पूर्वीपासून असा विचार करायला लागलास?

**नायक** (त्याच्याकडे दुर्लक्ष करून.) – छान तयारीची बाई आहे. नुसत्या डोळयांवरून जाणवतं – ती समजून घेईल. तिच्यात अराजकवाद्याचा

अंश आहे ... चटकन निर्णय घ्यायची ताकद आहे.

**अलेक्सेय** – मी तिची कसोटी घेईन.

**घोगरा** – हा-हा ... जा, जा – तिला क्रापोत्कीनची एक पुस्तिका दे!

**कमिस्सार** (प्रवेश करताना सभोवार पहात.) – कॉम्रेडहो, ह्या बैठकीबद्दल तुम्ही मला का कळवलं नाही? आता जमलाच आहात तर नव्या कमांडरला इकडं बोलवा. कोण जाईल त्याला बोलवायला?

गप्प राहतात.

(शिडीवरून जाणाऱ्या कुणालातरी उद्देशून.) ए; खालच्या मजल्यावरच्या! तिथं आहे का कुणी?

शिडीवरून एक मजबूत बांध्याचा **पांढरे केसवाला माणूस** येतो.

इकडे या. कॉम्रेड, तुम्ही कोण?

**तांडेल** (बसक्या आवाजात.) – तांडेल.

घोगरा तुच्छ हसतो.

**कमिस्सार** – तांडेल? अशा आवाजात आणि अशा रीतीनं तांडेल बोलत नाहीत. परत एकदा विचारते – कोण तुम्ही?

**तांडेल** (काहीतरी जाणवून तो नौदल धर्तीने बोलतो.) – 'सम्राट पहिले पावेल' बोटीचा माजी तांडेल, कॉम्रेड कमिस्सार.

अलेक्सेय आश्चर्याने घसा खाकरतो.

**कमिस्सार** – अस्सं, आता मला समजतंय की तुम्ही तांडेल आहात. नव्या कमांडरना इकडं यायचा निरोप द्या.

**तांडेल**—जसा हुकूम. (अचानक नायकाकडे केविलवाणेपणाने पाहतो.)

**कमिस्सार** – काय झालं ?

नायक संमतीदर्शक मान डोलावतो.

**तांडेल**—हो, नव्या कमांडरना इकडे यायचा निरोप देतो. (जातो.)

**घोगरा** (कमिस्सारला.) – तुम्ही आमच्या दृष्टीनं ठीक आहात...

**कमिस्सार** – मला माहीत आहे.

**घोगरा** – बाईची जात पुरुषांच्या रांगडेपणाला आवर घालते.

**कमिस्सार** – माझ्या ते एव्हाना ध्यानात आलंय.

बोटीचा **कमांडर** येतो आणि काहीशा अनिश्चितपणे सलाम करतो.

कॉम्रेडहो, एकमेकांच्या ओळखी करून घ्या.

शत्रुत्वाच्या कटाक्षांची देवघेव, घसे खाकरण्याचे आवाज आणि हातांची अस्पष्ट हालचाल.

अस्सं, झाल्या ओळखी? तर आता कामाला सुरुवात करू. (कमांडरला.) हुकूम वाचून दाखवा.

**कमांडर** (छातीवरील खिशामधून एक कागद बाहेर काढतो.) – "हुकूम – आजपासून बोटीवरच्या कंपनीचं 'स्वतंत्र अराजकी-क्रांतिकारक तुकडी' हे नांव रद्द करण्यात येत आहे. बोटीच्या कंपनीची तीन बटालियनांच्या रेजिमेंटमध्ये फेररचना करण्यात येत आहे आणि इत:पर तिला 'पहिली नौदल रेजिमेंट' म्हणून संबोधण्यात येईल." (कागदाची घडी घालतो.) रेजिमेंटचं नेतृत्व माझ्याकडं राहील.

**अलेक्सेय** (चटकन.) – सम्राट दुसरे निकोलाय यांचं उरालमध्ये काय झालं, ह्याबद्दल तुम्ही काही ऐकलंय ?

**कमिस्सार** – कॉम्रेड, ज्या व्यक्तीचा तुम्ही उल्लेख केलात, तिचं काय झालं याबद्दलची तपशीलवार माहिती जेव्हा फावला वेळ सापडेल, तेव्हा मी आपल्याला जरूर सांगीन. (कमांडरला.) ह्या कॉम्रेडला ज्ञानाची फार तहान आहे. तुम्हाला आठवत असेल तर मागच्या वेळी त्याला लग्नाच्या प्रश्नाबद्दल कुतूहल होतं. (अलेक्सेयला.) झालं तुमचं समाधान त्या खुलाशानं?

सर्व गप्प राहतात.

तर आता जणू सुरुवातीपासून सर्व काही... तुकडीला आता आपण रेजिमेंट म्हणत जाऊ. आपल्यापाशी भरपूर सामर्थ्य आणि शक्ती आहे. (अलेक्सेयला.) खरं ना? लैंगिक समस्यांवर वेळ वाया घालवणं गुन्हा आहे. मायभूमी, क्रांती धोक्यात आहेत.

स्तब्धता.

उद्या आपण युद्धआघाडीकडं कूच करू. ही हुकुमाची पुरवणी. (नायकाला.) युद्धआघाडीवर तुमच्या अनुभवाचा वापर करायला भरपूर वाव आहे. तुम्हाला काय वाटतं? (कमांडरला.) आवश्यक त्या सर्व व्यवस्था करा. आपण जायला मोकळे आहात.

**कमांडर** – जशी आज्ञा.

**कमिस्सार** – तांडेल, तुम्ही जाऊ शकता.

**तांडेल** (नायकाकडे कटाक्ष टाकीत.) – जशी आज्ञा.

स्तब्धता. ती माणसे निघून गेल्यावर नायक उठतो आणि सावकाशपणे कमिस्सारपाशी जातो.

**नायक** – आपण बोलू या का?

**कमिस्सार** – जरूर.

चौघे टेबलापाशी बसतात. गंभीर मौन.

**अलेक्सेय** – आमचं म्हणणं असं आहे: तुमच्या मध्यवर्ती समितीनं चुकीचं माणूस इकडं नेमलंय. तुम्ही नौदलाला योग्य नाही. पायदळात तुम्ही ठीक ठरला असतात.

**कमिस्सार** – मी पायदळातही काम केलंय.

नायक, घोगरा आणि अलेक्सेय एकमेकांकडे पाहतात.

**घोगरा** – अच्छा, असं आहे तर...

**अलेक्सेय** – तुम्ही फार तरुण आहात. जेव्हा तुम्ही दाईबरोबर बागेत खेळत होतात, तेव्हा हा (अर्धपरिचित आणि अर्धआदरयुक्त खुणेने नायकाचा निर्देश करीत) शेतकी प्रश्नावरून सक्तमजुरी भोगत होता...

मधल्या स्तब्धतेत चौघेजण ह्या वस्तुस्थितीचा अजमास घेतात.

फार अवघड आहे – कृपा करून गैरसमज करून घेऊ नको, चुकीचा समज करून घेऊ नको, पण अशा परस्परविरोधी प्रवृत्तीच्या माणसांनी (हातांनी खूण करून) – तू आणि आम्ही – एकत्र काम करणं मानसिकदृष्ट्या फार अवघड आहे. (ताठ उभा राहतो.) खरंच तुलना कर: तू आणि आम्ही. आम्ही भटके – दर्यावर्दी चांगल्या अर्थानं! सबंध जगाला प्रदक्षिणा घातल्यात, किल्ल्यांमधून पळालो आहोत, युद्धांचा अनुभव घेतलाय, कैदी बनलो होतो...

**घोगरा** (कमिस्सारच्या हाताला स्पर्श करीत.) – दोनदा सिफीलिसनं आजारी पडलो...

**कमिस्सार** – काय करणार? जी माणसं प्रत्यक्षात आहेत त्यांच्याबरोबरच काम करावं लागतं. कल्पनेतल्या माणसांबरोबर नव्हे. पण एकूण

आपल्या रेजिमेंटमध्ये खूप चांगली, लढवय्यी माणसं आहेत, ज्या माणसांनी...

**अलेक्सेय** (तिचे बोलणे अर्धवट तोडत)–ज्या माणसांनी कुणालाही खडी ताजीम देऊन सलाम करण्याची सवय कायमची टाकून दिलीय... (नक्कल करतो.) "हो, कॉम्रेड कमिस्सार," "आम्ही समाधानी आहोत, कॉम्रेड कमिस्सार," "चुकलं, कॉम्रेड कमिस्सार," "हुर्रा, कॉम्रेड कमिस्सार!" तुझी कदाचित अशी अपेक्षा आहे?

**घोगरा** (परत कमिस्सारच्या हाताला स्पर्श करून, सलगीने.)– आमचं सगळं आयुष्य पांगळं बनलंय. बराकींनी आणि तुरुंगांनी आम्हाला मोडून टाकलंय... बोटीवर आम्हाला गोंदवलंय आणि दारूत भिजवून काढलंय, आता तुम्ही आम्हाला जाणीवेची खीर भरवू पाहताय... बाईसाहेब, आमच्या उरलेल्या आयुष्याचे दिवस आमच्या इच्छेप्रमाणं घालवायची आमची इच्छा आहे. काय शोधताय तुम्ही आमच्यात? आमची अखेर बंदुकीच्या गोळीनं व्हायचीय आणि मगच आम्हाला कायमची शांतता मिळायचीय. (क्षणभर गप्प राहतो.) इथं (स्वतःच्या गळसरीच्या हाडाला बोटांनी दाखवत) फक्त इथं अजून इच्छा राहिलीय की, माणसं मनानं आणि शरीरानं शुद्ध असावीत. आणि तुम्ही इथं शिकवायला आलात, आमचा निवाडा करायला आलात, जेव्हा शेवटचा श्वास सोडायची आमची वेळ भरलीय.

**कमिस्सार**–तुमच्याकडून काही शिकायला माझी ना नाही... मात्र शिकण्यासारखं काही असावं!

**नायक**–हे छान! आम्हाला निदान खुलासा कर. आम्ही आमचे जीव द्यायला तयार आहोत? होय. पण गंमत अशी की, तुझा पक्ष, सत्तेवरचा पक्ष, जी माणसं त्याच्यासाठी प्राण द्यायला तयार आहेत, त्यांच्यावरच अटी लादू लागलाय. ह्याला काय म्हणायचंय? हे कसं काय?

**कमिस्सार**–अगदी सोपं आहे. आम्ही कुठं जातोय ते आम्हाला

माहीत आहे आणि तिथपर्यंत कसं पोहचायचं हेसुद्धा ठाऊक आहे. म्हणून आम्ही अटी घालतो आणि माणसं त्यांना मान्य करतात. जर त्यांना त्या मान्य नसत्या, तर त्यांच्यावर त्या लादणं आम्हाला शक्य झालं नसतं.

**अलेक्सेय** – आम्ही कसं मरावं हेसुद्धा कदाचित आम्हाला तुम्ही शिकवणार आहात काय?

**कमिस्सार** – तशी वेळ आली तर बघू.

**नायक** – होय, होय... (स्वर बदलून.) माझ्या तुकडीनं तुमचं तसं स्वागत केलं म्हणून तुम्ही रागावू नका. त्यांना अंदाज आला नाही.

**कमिस्सार** – झालं ते झालं... आता कशाला आठवण?

**अलेक्सेय** (एकदम उठत). – जेव्हा मी तुमच्याकडं पाहतो, स्वतःकडं पाहतो, तुझ्याकडं बघतो... नेक लढवय्ये, झक मारले! (नायकाला, मग कमिस्सारला.) तू खोटं बोलतोस आणि तूही खोटं बोलतेस... (कमिस्सारला.) ऐक. (नायकाकडे बोट दाखवून.) जेव्हा तू आलीस तेव्हा ह्यानं आम्हाला तुझ्यावर पाठवलं. म्हणाला: तिला घाबरवून टाका, म्हणजे उठून उभीसुद्धा राहणार नाही!

**नायक** (आवेग दाबण्यासाठी हसतो.) – थट्टा करतोय तो!

**कमिस्सार** – अर्थातच तुम्ही थट्टेखोर आहात... ताबडतोब लक्षात येतं!

**अलेक्सेय** – "थट्टेखोर"? मला एक सुरा हाती घ्यावासा वाटतोय. माझा मेंदू चिरावा आणि खळखळून धुवावा... ह्या गाळात मी काय धुंडाळतोय?

स्तब्धता.

(कमिस्सारला उद्देशून.) तूसुद्धा धीम्या स्वभावाची आहेस. शांतपणं वाट पहात बसून आहेस शहाण्यासारखी: "तुमच्यापासून शिकेन... समजतं मला..." डावपेच खेळते आहेस. तूसुद्धा खोटारडी! आम्ही

बघितलं, खलाशांना कशा धडाधड गोळ्या घालतेस!

**कमिस्सार** (नायकाला.) – फार अस्वस्थ मनाचा कॉम्रेड आहे हा! (अलेक्सेयला.) तुम्ही अराजकवादी पक्षाचे सभासद आहात?

**अलेक्सेय** – मी स्वतःच्या टीकात्मक विवेकाच्या पक्षाचा आहे. माझा पक्ष म्हणजे अपक्ष! (उमाळ्याने.) तुम्ही कुठं आलात? आं? हेमंत प्रासादासमोर आम्हाला विचारलं होतंत – तुम्ही कोणत्या पक्षाचे म्हणून?

**घोगरा** (अलेक्सेयला बाजूला सारून.): बाईसाहेब, एकमेकाला समजून घेणं ह्यात खूप काही आहे. तुम्हाला वाटलं होतं, आम्ही खलाशी म्हणजे बेलबॉटम विजारी घालणाऱ्या पोरांचा कळप – आजकाल शेंबडी पोरं घालतात तसल्या! पण इथं बुजुर्ग बसलेत एकाहून एक! जपानी मोहीम, त्सूसिमा... असल्या गोष्टी आम्हाला आठवतात!

**कमिस्सार** – हे तर फारच छान! (उठून.) मला वाटतं, आपलं जुळेल एकमेकांशी!

**नायक** – घेतलं पाहिजे जुळवून. होय ना? (अत्यंत आत्मविश्वासाने, अधिकाराने हात पुढे करतो.)

**कमिस्सार** – घेऊ जुळवून. मात्र एका अटीवर: यापुढं थट्टा बंद!

अंदाज घेणारी, अवघड हस्तांदोलने. अलेक्सेय न्याहाळतो. **कमिस्सार** निघून जाते. बाकीचे तिघे तिच्या दिशेने टक लावून पाहतात. पावलांचा आवाज विरत जातो.

**घोगरा** – वा! नमूना आहे!

**नायक** (अलेक्सेयला.) – जीभ सैल सोडणाऱ्याचं काय होतं माहीत आहे?

**अलेक्सेय** – फितुराचं काय होतं माहीत आहे? हात दाबतोस काय? जुळवून घ्यायची इच्छा आहे काय?

**नायक** ( सूचकपणे . ) – तोसुद्धा डावपेच आहे . तुला आज काय झालंय अलेक्सेय ? मित्रा , माझ्यावर विश्वास ठेव . तुझा भाऊ समजून ऐक : विचारासाठी – आपण शेवटपर्यंत एकत्र राहू ! ( आपल्या कॉम्रेडला मिठी मारतो आणि त्याच्या ओठांचे जोरदार चुंबन घेतो . )

अलेक्सेय काहीशा अविश्वासाने अनिश्चित नजर टाकतो व मान हलवून निघून जातो . घोगरा त्याच्यामागून काही पावले जातो , मग थांबून कानोसा घेतो .

त्याच्यावर किंवा तिच्यावर , दोघांपैकी कुणावरच विश्वास टाकू नको . ( जोरात ओठ पुसतो आणि थुंकतो . ) सापाचा मुका घेतला !

**घोगरा** – कुणावर विश्वास ठेवायचा ?

नायक खांदे उडवतो .

फक्त तुझ्यावर ?

**नायक** – माझ्यावरसुद्धा विश्वास ठेवू नको . सगळे घातकी आहेत . सगळे विषारी आहेत . सगळ्यांना मुळांपासून उपटून काढलं पाहिजे . प्रत्येकात जुन्या आयुष्याचा अंश उरलाय !

गप्प राहतात . गंभीर चेहऱ्यांनी निघून जातात . **रेजिमेंटचे कनिष्ठ अधिकारी** प्रवेश करतात .

**पहिला कनिष्ठ अधिकारी** – आठवा , आठवा अलिकडचे चांगले दिवस , म्हणजे तुम्ही काहीही विसरणार नाहीत . अजून अवधी आहे तोवर सगळं आठवून घ्या आणि सर्व शिकून घ्या . नवं युद्ध येण्याआधी . शत्रूंची आठवण ठेवा , प्रतिक्रांती आठवा ! प्रत्येक फटीतून ती डोकावत होती . रात्रंदिवस आपला विश्वासघात घडत होता . आपल्याला चारी बाजूंनी वेढलं होतं आणि आपली नरडी आवळलेली होती . अराजकानं

आपल्या माणसांची संख्या पातळ केली. श्वेतरक्षक पीटरबुर्गपासून अवघ्या दहा वेर्स्ता* अंतरावर येऊन ठाकले होते. मॉस्कोत श्वेतरक्षक दबून बसले होते आणि नुसत्या इशाऱ्याची वाट पहात होते. आम्ही त्यांना "इशारा" दिला...

**दुसरा कनिष्ठ अधिकारी** – आम्ही कचेऱ्या बंद केल्या. आम्ही उतारूंची वाहतूक थांबवली. आम्ही पिस्तूलं हाती घेतली, कामगारवर्गाला जागृत केलं आणि प्रतिक्रांतीची खोपडी फोडली. ह्या प्रहारांची इतर ठिकाणी योग्य वेळी आणि प्रभावीपणं आम्ही पुनरुक्ती केली... इतिहास ह्याला साक्षी आहे! आणि पुन्हा जर शत्रूनं आमच्यावर हल्ला करण्याचा दिवस उजाडला, तर आम्ही परत तसाच वज्राघात करू, ज्यापुढं कुणाचाही निभाव लागणार नाही...

**कमांडर** आणि त्याच्यापाठोपाठ **तांडेल** येतात.



**कमांडर** – तर तांडेल, नव्या मालकाची सेवा करण्याचा प्रयत्न करू या. आयुष्य आपले मालक बदलतंय.

**तांडेल** (सावधपणे.) – अगदी बरोबर. कुणाला आयुष्याचे खेळ समजणार?

**कमांडर** – तांडेल, तुला माहीत आहे? सेवा कशी बजावायची हे जर त्यांना माहीत असतं, तर मग बाकी कशालाही तोंड द्यायची माझी तयारी होती. ह्याला काय नोकरी बजावणं म्हणतात? तुझंच उदाहरण घे – तुझे हुकूम पाळतात ते? तुझ्या वयाचा काही आदर बाळगतात?

**तांडेल** (उसासत). – कसला आदर नि कसलं काय!

---

* वेर्स्ता – १,०६६८ कि. मी.

**कमांडर** – पण आपल्याकडं व्यवस्थित चाकरी करणारी माणसं होती...

**तांडेल** – खरंच, पूर्वी चोख चाकरी बजावणारी माणसं होती! ती नुसती चाकरी नव्हती – एक कला होती!

**कमांडर** – पुन्हा घडी बसवणं जमणार नाही?

**तांडेल** (कमांडरला अनपेक्षितपणे.) – जर ह्यांना मी काही शिकवू शकलो, तर मग शांत मरायला हरकत नाही!

**कमांडर** (मुद्रा बदलत.) – हो... तांडेल... माणसांना एकत्र करा!

**तांडेल** – जशी आज्ञा. सगळे डेकवर चला! शिंगवाला!

शिंगवाला शिंग फुंकून इशारा देतो. त्यातून लष्करी सेवा, वेग आणि कार्यक्षमता सूचित होतात.

सगळे डेकवर जमा व्हा!

**उंच खलाशी** धावत येतो. त्याच्या पाठोपाठ किंचित सावकाशपणे **म्हातारा खलाशी**, मग **दुसरा**, त्यानंतर आणखी **तिसरा**. त्या सर्वांपाठी **देवीचे वणवाला** येतो. तो रमतगमत, मंदपणे चालत येतो. बाकीचे अनेकजण त्याची नक्कल करतात.

**म्हातारा खलाशी** – अरे ए, स्वतंत्र विचारवाल्यांनो...

**देवीचे वणवाला** – काय भानगड आहे?

**तांडेल** – इशारा ऐकला नाहीस? लष्करी शिस्त विसरलास?

**देवीचे वणवाला** – होय, विसरलो.

शिंगवाला परत इशारा वाजवतो. काही रांगेत उभे राहतात. बाकीचे मुद्दाम खिशात हात घालून, जांभया देत व आळोखेपिळोखे काढत अधिकाऱ्यासमोर फिरतात. पण **नायक** येताच सगळे नेहमीप्रमाणे एकदम गप्प होतात.

**नायक** – कशाबद्दल गोंगाट ?

**कमांडर** ( अधिकाराच्या सुरात . ) – तुमची जागा कुठं ?

भीतीदायक शांतता .

**नायक** ( संयम धरून . ) – तांडेल !

**तांडेल** – काय हुकूम ?

**नायक** – त्याला समजावून सांग ... तुकडीला विश्रांती घेऊं दे .

तांडेल केविलवाणेपणाने पुनरुच्चार करतो : " सांगायचा हुकूम झालाय की , तुकडीला विश्रांती घेऊं दे ! "

विश्रांती हासुद्धा सेवेचाच एक भाग आहे . उद्या कूच आहे ना ? उद्या कूच . तर मग अंगात ताकद एकवटू देत . कुणालाही त्रास देऊ नका .

तांडेल परत बोलतो : " सांगायचा हुकूम झालाय की , कुणाला त्रास देऊ नका . "

बँडवर काहीतरी हलकं-फुलकं संगीत वाजवा . बँडमास्तर !

**बँडमास्तर** ( तत्परतेने . ) – हाजीर !

**नायक** – काहीतरी हलकं-फुलकं !

**बँडमास्तर** नम्रपणे मान झुकवतो .

**देवीचे वणवाला** ( आरामात रेलत . ) – विश्रांती घे तांडेल . हुकूम आहे : कुणालाही त्रास द्यायचा नाही .

तांडेल खेदाने उभा राहतो . अनेकांचे नेतृत्व करीत **घोगरा** प्रवेश करतो . तो संतापलेला आहे . काहीतरी घडल्याची माणसांना जाणीव होते . घोगरा ओरडतो त्याक्षणी संगीताचे पहिलेच सूर तात्काळ थांबतात .

**घोगरा** – जरा गप्प रहा! एक वाईट बातमी आहे – क्रांतिकारक खलाशांच्या दृष्टीनं अत्यंत वाईट! (शिडीकडे उद्देशून.) त्या बाईला, त्या स्कर्टमधल्या कमिस्सारला, इकडं सोडू नका!

एक खलाशी आज्ञाधारकपणे पहाऱ्यावर उभा राहतो.

म्हाताऱ्या बाईला वाईट वागवलं! तिचा बटवा चोरलाय! आणा तिला इकडं!

वार्धक्याने वाकलेली, सुरकुतल्या चेहऱ्याची, काळ्या पोषाखामधील एक **म्हातारी** खलाशाच्या आधाराने चालत येते.

**नायक** – बोल, आई.
**घोगरा** – बघ आई, कुणी तुला लुबाडलं?

माणसे एकमेकांकडे बघतात.

दाखव आई, कोण आहे तो?
**नायक** – सगळे उभे रहा! खटला चालू झालाय!

खलाशाच्या हाताचा आधार धरून म्हातारी खलाशांच्या चिंताग्रस्त वेड्यावाकड्या रांगांमधून फिरते. मधूनमधून ती थांबते आणि कुणाकडे तरी टक लावून पाहते. मग मान हलवून पुढे चालू लागते. उंच खलाशी हा सर्व प्रकार उपरोधी, मग्रूर मुद्रेने पहात असतो.

**घोगरा** (अचानक.) – हा तर नव्हे, आई?

स्तब्धता .

तर मग हा ?

बाई गप्प .

( उंच खलाशाला . ) तू घेतलास ?

स्तब्धता .

खिसे दाखव !

**उंच खलाशी** – पुरे झाला तमाशा !

**घोगरा** – कायदा माहीत आहे ?

**उंच खलाशी** – कुणाचा कायदा ?

**घोगरा** – अस्सं ! ( नायकाकडे पाहतो . )

**नायक** – अंमलात आणा .

**घोगरा** ( साहाय्यकांना . ) – अंमलात आणा !

साहाय्यक ताबडतोब ताडपत्री आणि दोरखंड आणतात . माणसांमध्ये चलबिचल होते .

शेवटचं सांगतो : तुझे खिसे दाखव .

**उंच खलाशी** – पुन्हा पुन्हा सांगणार नाही . अराजकवाद्यांची सत्ता मी मानत नाही .

**घोगरा** – बोला !

**कमांडर** – त्यासाठी लष्करी कोर्ट आहे !

**घोगरा** – तुमचं काम – तांत्रिक आहे .

**म्हातारा खलाशी** – कॉम्रेडहो !

**घोगरा** – तुझं काम त्या कमिस्सारबरोबर. राजकीय. वर्तमानपत्रं वाटायचं.

**कमांडर** – हा जमावाचा कायदा झाला! मी निषेध नोंदवतो.

**नायक** – चूप रहा! साध्या रीतीनं आणि पटकन ह्याचा निकाल लावू! मतदान करा.

काही हात वर होतात. अर्थात त्यांची संख्या फार नाही. घोगरा हातात मॉसर रिवॉल्वर घेऊन रांगांमधून फिरतो. आणखी काही हात वर होतात.

**घोगरा** – पोत्यात बैस.

**उंच खलाशी** – मी ...

**घोगरा** – बोलू नकोस. शिक्षा कायमची फर्मावलीय. त्यावर अपील नाही.

**त्याचा मदतनीस** – त्याला बोटीवरून पाण्यात फेका!

अनेक माणसे उंच खलाशावर तुटून पडतात. तो एकाला पाडतो, दुसऱ्याला पाडतो... धडपड होते आणि त्याला फरफटत नेतात.

**उंच खलाशी** – कॉम्रेडहो!.. ते काय करताहेत...

पाण्यात त्याचे शरीर पडते तेव्हा देह बुडण्याचा आवाज.

**आवाज** – मेला!

**घोगरा** – ह्याला न्याय म्हणतात, आई!

**म्हातारा खलाशी** – तुम्हाला ह्याचा जाब द्यावा लागेल.

**घोगरा** – ती वेगळी बाब. बँडवाले, वाजवा. (म्हातारीला.) जा, आई. चुकीची भरपाई झालीय.

**देवीचे वणवाला** – तिला मदत करा.

तिच्या सुकलेल्या तळहातावर पैसे ठेवतात. काय घडले ह्याची जाणीव नसलेली म्हातारी गोंधळून कृतज्ञतेने खाली झुकते. एकूण परिस्थितीच आगळी. म्हातारी यांत्रिकपणे स्वत:चा खिसा चाचपते आणि बटवा बाहेर काढते. संगीत एकदम थांबते. शांतता. म्हातारी चकित होऊन डोळे विस्फारते आणि नंतर घाबरून बटव्याकडे पाहते.

**घोगरा** – बटवा!

**देवीचे वणवाला** – बटवा?

शांतता.

**नायक** – दाखव.

**घोगरा** – अराजक – शिस्तीची माता. आणखी एक ताडपत्री!

**देवीचे वणवाला** (वाटेत आडवा येत.) – तिला माफ करा!

**आवाज** – ती मुद्दाम नाही वागली!

**म्हातारा खलाशी** – तिची चूक झाली!

**म्हातारी** — बाळांनो ... मुलांनो ... देवा रे! माझी चूक झाली!

**घोगरा** – न्याय!

संतापल्या घाईने म्हातारीला पोत्यात बांधून, वर उचलतात.

**नायक** (निघून जात.) – तिला दुखापत करू नको.

**कमिस्सार** प्रवेश करते. तिच्याबरोबर **कमांडर** आणि **तांडेल**.

**कमिस्सार** – कामाला सुरुवात केलीत?

**घोगरा** – अर्थात ... अर्थात! (पोत्यात बांधून नेलेल्या देहाच्या

दिशेने.) मांस भरतोय! तुम्ही येताच प्रत्येकाला काम करावंसं वाटू लागलंय!

**म्हातारा खलाशी** (पुढे घुसत.) – कॉम्रेड कमिस्सार, मला सांगायचंय की...

त्याला मागे ढकलतात.

**देवीचे वणवाला** – अरेच्चा, हे काय चाललंय बंधूंनो?

ॲकॉर्डियनचे सूर. नाचणाऱ्या, शिट्या मारणाऱ्या, मुक्त वावरणाऱ्या माणसांसह **अलेक्सेय** प्रवेश करतो.

**अलेक्सेय** (जवळ येत.) – बोटीच्या कंपनीची मागणी आहे...

**कमिस्सार** – विनंती.

**अलेक्सेय** – असं म्हणू – इच्छा आहे.

**कमिस्सार** – काय?

**अलेक्सेय** – निरोपाचं बॉलनृत्य.

**त्याच्याबरोबरचा एकजण** – युद्धआघाडीवर कूच करण्याच्या निमित्तानं!

**कमांडर** (कमिस्सारला.) – आता नव्या परंपरा स्थापन होत आहेत.

**अलेक्सेय** – जुनी परंपरा राखून आहोत... झारच्या अंमलदारांना नेहमी झोडपून काढायची! (तो ॲकॉर्डियनवर आक्रमक सूर वाजवतो.)

**तांडेल** – कॉम्रेड कमिस्सार... सांगायला अवघड वाटतं, पण अराजकवाद्यांच्या दुसऱ्या कमिस्सारनं हुकूम दिलाय... तुकडीतल्या कुणालाही त्रास द्यायचा नाही!

**अलेक्सेय** – का-य ? आम्हाला विरोध करायचा त्याचा इरादा आहे काय ? बोटीच्या कंपनीच्या विनंतीप्रमाणं करा.

स्तब्धता. कमिस्सार विचारात पडते. मग तिच्या मनाचा निर्धार झालेला दिसतो. एकूण ती बोलण्यापेक्षा जास्त निरीक्षण व विचार करते. कारण पुढे तिला खूप काही करावे लागणार आहे.

मी तुम्हाला दोनदा विचारलं पाहिजे का ?

**घोगरा** (जवळ येत.) – गोंगाट करू नका असा हुकूम आहे.

एकदम स्तब्धता पसरते.

**कमिस्सार** – निरोपाची संध्याकाळ !

**तांडेल** – जसा हुकूम – निरोपाची संध्याकाळ ! (अलगूज वाजवीत.) चला, निरोपाच्या संध्याकाळसाठी सगळे हजर व्हा !

हुकुमांचा पुनःपुन्हा उच्चार होत असताना अलगुजांचे मधुर स्वर उमटू लागतात. अलेक्सेय बेभानपणे ॲकॉर्डियन वाजवतो, त्याचे साथी शिटचा मारतात आणि नाचतात. मग गोंधळल्या जाणीवे-पायी नायकाच्या आगमनासरशी माणसे नेहमीप्रमाणे गप्प होतात.

**नायक** (तांडेलाच्या अलगुजावर हात ठेवीत). – हा कसला गोंगाट ?

सगळी अलगुजे वाजायची थांबतात. अलेक्सेयचे ॲकॉर्डियनही थांबते.

**कमिस्सार** (कमांडरला अधिकाराच्या स्वरात). – कॉम्रेड कमांडर, हुकूम अंमलात का येत नाही ?

**कमांडर** – तांडेल ! खलाशांच्या घरच्या माणसांना निरोपासाठी बोटीवर येऊं द्या !

**तांडेल** ( घुटमळतो, मग मनाचा निर्धार करून नायकाचा हात बाजूला सारतो ). – जसा हुकूम ! नातेवाईकांना निरोप देण्यासाठी बोटीवर सोडा !

पुन्हा खलाशांचे जोरदार नाच-गाणे सुरू होते. काही लोक संमती-दर्शक आणि काही लोक भीतीने पहात असतानाच कमिस्सार नायकाला सलगीने हलकासा धक्का मारते. तिच्या प्रत्येक कृती-प्रमाणे ही कृती आधी ठरवून केलेली असते.

**कमिस्सार** – ऐका ! मी म्हणते – मौज करा !

नायक गप्प.

**अलेक्सेय** ( नायकासमोर अॅकॉर्डियन वाजवीत ). – तो सर्वांत शेवटी हसतो.

**कमिस्सार** – म्हणजे आमच्या सवयी सारख्या आहेत.

निरोपाच्या बॉलनृत्याची तयारी.

**पहिला कनिष्ठ अधिकारी** – नौदलाचा निरोपाचा बॉलनृत्य समारंभ ! त्या काळात असे कितीतरी समारंभ झडले ! तीनशे माणसांची तुकडी युद्धआघाडीवर निघाली – प्रत्येकजण समुद्रालगत वाढणाऱ्या शीडाच्या लाकडाच्या झाडासारखा भक्कम. मुक्त-स्वच्छंदी खलाशी खंडांचा संचार करायला उत्साहाने निघाले. निळ्या कॉलरी वाऱ्यावर फडफडत होत्या, त्यांच्या शुभ्र आणि काळ्या गणवेषांना सोनेरी किनारी होत्या. त्यांच्या

काळजांमधून अधीर लाल रक्त धपापत होते. हे मायभूमी, तुला दंडवत! त्यांच्यापैकी फार थोडे परतले.

**दुसरा कनिष्ठ अधिकारी**– त्यांच्यापैकी फार थोडे परतले... दुसरे, जिवंत असलेले, जातील! परत बोटीवरून नवी तुकडी निघालीय. निळ्या आकाशाखाली त्यांचं कूच चालू आहे आणि शत्रूंमध्ये शांतता पसरलीय. आक्रमक फौजा मागं सरल्या... उरालचा रस्ता अंमलदारांच्या 'अजिंक्य' रेजिमेंटने अडवून धरला होता. खलाशांच्या लढाऊ तुकडीनं तिचा समाचार घ्यायला फक्त एक रात्र मागितली. त्या हल्ल्यानंतर रेजिमेंटचा मागमूस राहिला नाही.

**पहिला कनिष्ठ अधिकारी** – लढाऊ तुकड्यांनी युक्रेन ओलांडलं, तावरीया ओलांडलं. हवेत समुद्राचा आणि दवण्याचा दर्प दरवळतोय. दक्षिणवारा खलाशांच्या टोप्यांच्या फितींना झोंबतोय... खलाशी युक्रेन-साठी बलिदान करताहेत! (डोक्यावरची टोपी झटकन काढतो.) ऐका! जोवर निदान एक खलाशी जिवंत आहे, तोवर आमचं नौदल संपलं असं समजू नका! आमचा सागर शरण आला असं मानू नका!

बॉलनृत्याच्या पहिल्या हालचाली. करुण आणि लढाऊ वॉल्तझच्या सुरांवर पहिली जोडपी नाचायला आरंभ करतात. सागरावर रात्रीचे निळसर धुके पसरते. त्या तालांमध्ये किंचित दडपलेली खिन्नता आहे. जोवर हात आणि देह एकमेकांना स्पर्शत आहेत, डोळ्यांमध्ये डोळे गुंतले आहेत, तोवर प्रदीर्घ काळ ती खिन्नता टिकू शकेल. संगीताच्या तालांवर शस्त्रे घेऊन जाणाऱ्या माणसांच्या रांगा दिसतात. ह्या नृत्यात सर्व गोष्टींचा मिलाफ आहे: विस्मृती, चिंता, प्रेम, मत्सरापायी रगडले जाणारे दात, चांचल्य, दुहेरी सत्ता... माणसांना बोलावणारा इशारा वाजतो. जोडपी सावकाश-पणे विलगतात. विरहाची वेळ झाली. काही स्त्रियांचे चेहरे

पांढरेफटक पडतात. एक आवेगाने मिठी मारते. दुसरी आपल्या मुलावर अथवा नवऱ्यावर क्रूस-चिन्ह करते. तिसरी आपल्या लाडक्याच्या पायांवर लोळण घेते. हृदयभेदक किंकाळी. युद्धकाळा-तील निरोपाच्या वेळेचे हे क्षण. वॉल्तझमधून मरणयातना उमटताहेत. दु:खाने वेडया बनलेल्या एका स्त्रीचे सांत्वन करण्याचा कमिस्सार प्रयत्न करतेय. खलाशी जायला निघतात. रेजिमेंट संचलन करीत जात असताना बायका आत्यंतिक शांतपणे पहात उभ्या राहतात. बँडवर संगीत सुरू होते. रेजिमेंटमधून रणगीत घुमू लागते. एकवटणाऱ्या संधिप्रकाशात डोळे आणि दात चमक-तात, बोटींची नांवे पुढे असणाऱ्या टोप्या चमकतात. बायका उभ्या आहेत तो समुद्रकिनारा हळूहळू दूर होत जातो. दर सेकंदाला त्यांच्यातील अंतर वाढत जाते. तरीही खलाशी आपल्या गावाकडे, नातेवाईकांकडे परत परत वळून पाहतात. तोफांची सलामी पुन:पुन्हा गर्जत असते.

चिंताग्रस्त, सावधगिरीने भरलेली शांतता. अस्पष्ट दिसणारे क्षितिज. दाट काळे मेघ. लढाऊ रांगा सतत पुढे सरकत आहेत. लढाईचे पहिले आवाज संगीत सूचित करतेय. खलाशांच्या रांगांमध्ये मोठमोठ्या पोकळ्या दिसतात. माणसे पटापट खाली कोसळतात. दबावामुळे **खलाशी** माघार घेतात. त्यांची राखीव फौजेशी गाठ पडते. साध्या आज्ञेने **कमिस्सार अलेक्सेयला** व इतरांना थांबवते: "नौसैनिकांनो, चुकीच्या दिशेनं लढताय! खाली पडा!" रेजिमेंट खाली आडवी होते. शत्रूच्या रांगा राखी हिमानीप्रमाणे चालून येतात. कमांडर उठतो आणि "हुर्रा" आरोळी ठोकतो. ह्या आरोळीचे वाढते प्रतिध्वनी उमटत जातात. रेजिमेंट शत्रूवर तुटून पडते आणि हळूहळू रणगर्जना अवकाशात विरून जाते. हा रात्रीचा हल्ला होता. लढाईचे विरणारे आवाज आणि सागर-किनाऱ्यानजीक दिवस उजाडत असल्याचे संगीत सूचित करते. विशुद्ध स्वरमेळ उलगडत रक्तामध्ये भिनतात. रेजिमेंटची छावणी. **कमिस्सार** स्वतःच्या खोलीत. ती लिहितेय.

**कमिस्सार** (स्वतः लिहिलेला मजकूर वाचतेय). – "प्रिय आन्ना, तर मला नेमलेल्या जागी मी पोहोचलेय. इथली हवा निकोप आहे, त्यामुळे माझ्या फुफ्फुसांना निदान थोडी विश्रांती लाभेल. ह्या माणसांना कसे हाताळावे ते समजत नाही – फार अवघड आहेत. खरे सांगायचे तर एकही रात्र झोप नाही... आशा करतेय की, माझ्या अडचणी समजून निदान एका कॉम्रेडला मदतीसाठी इथे धाडतील..."

दारावर टकटक. कमिस्सार – "आत या." **तांडेल** प्रवेश करतो. किंचित खोकतो आणि डोक्यावरील टोपी काढतो.

**तांडेल** – अहवाल सादर करायची परवानगी द्या, कॉम्रेड कमिस्सार.

**कमिस्सार** – बोला, तांडेल.

**तांडेल** (एकामागून एक कागद बाहेर काढत). – हे तुमच्या सह्यांसाठी. नव्यानं स्थापन झालेल्या रेजिमेंटच्या तिच्या दर्जानुसार आणि स्थितीनुसार लष्करी आणि इतर मागण्या. त्याखाली (तिला कागद दाखवत) – तो नव्हे, हा – खाण्याच्या वस्तूंची मागणी.

**कमिस्सार** – बघू. (पाहते.) स्वतःसाठी ते काय मागवताहेत! लोणी! लहान मुलांनासुद्धा ते पुरेसं नाही... इथं बंदुकीचं तेल मागवणं जास्त हिताचं ठरेल, तांडेल.

**तांडेल** – अगदी बरोबर. पंचवीस वर्षं मागवत होतो – उठाव होईपर्यंत!

**कमिस्सार** (एक कागद परत देत). – हा परत लिहा. दर्जा नमूद करा. (दुसरा न्याहाळते.) बरोबर... ठीक... (सही करते.) घ्या.

**तांडेल** – मी जाऊ शकतो, कॉम्रेड कमिस्सार?

**कमिस्सार** – होय, तांडेल.

**तांडेल** (जाण्यासाठी वळतो, मग परत येतो आणि औपचारिकपणा सोडून). – खरंच रशियात सुरळीत शिस्त सुरू होतेय?

**कमिस्सार** – काळजी करू नका. ती एव्हाना सुरू झालीय.

**तांडेल** – सेना आणि नौदल असतील? निदान थोड्या प्रमाणात? योग्य भावना आणि माणसं असलेली? काही झालं तरी आपण एक महासत्ता आहोत! मस्तीखोराचं थोबाड फोडायची ताकद पाहिजे!

**कमिस्सार** – फोडू, तांडेल! जरूर पडेल तेव्हा सणसणीत थोबाड फोडू!

**तांडेल** – माझ्याकडून होईल तेवढं सगळं मी करीन. (सलाम करून निघून जातो.)

**कमिस्सार** ( परत पत्राकडे वळते ) . – " ... बस्स , एवढेच ! खरंच, लाडक्या पीटरबुर्गला नमस्कार ... वाचले की तुमच्याकडे विषमज्वराची साथ सुरू झालीय . स्वत:ला सांभाळ ... "

दारावर टकटक न करता हसऱ्या मुद्रेने **वायनोनेन** प्रवेश करतो .

**वायनोनेन** – सुप्रभात , कॉम्रेड कमिस्सार .

**कमिस्सार** – सुप्रभात , वायनोनेन .

**वायनोनेन** – तू अजून लिहीतच बसली आहेस ? सांभाळ , डोकं फुटेल ! अहवाल ?

**कमिस्सार** – हो , तसंच काहीसं ! मी लिहिलंय की , एकूण रेजिमेंट चांगली आहे , असं म्हणू , समाधानकारक लढवय्यी आहे , पण तीन व्यक्तींपायी इतर विभागांपेक्षा मागं पडतेय .

**वायनोनेन** – अराजकवादी – हलकट सैतान साले !

**कमिस्सार** – अगदी बरोबर . आता ह्यावर आपण थोडी चर्चा करू या ! ह्या " सैतानां " च्या प्रभावाचा खुलासा तू कसा करशील ? त्यावर तू कोणता उपाय योजला असतास ?

**वायनोनेन** – मी ... म्हणजे ... मी काय करणार ...

**कमिस्सार** – हे उत्तर काही स्पष्ट नाही .

**वायनोनेन** – हो ... मला रशियन भाषेत चांगलं बोलता येत नाही . अशा बाबतीत काय करता येईल ? ( तत्त्वज्ञानपर . ) एक माणूस दुसऱ्यांवर सत्ता गाजवू शकतो , पण दुसरा गाजवू शकत नाही – असं का हे माझं मलाच ठाऊक नाही . का बरं असं ?

**कमिस्सार** – तुझ्याबरोबर व्यवहारातल्या प्रत्यक्ष गोष्टींची चर्चा करते आहे ... ( उठते . ) रेजिमेंटमध्ये काही अस्सल माणसं आहेत . बघितलंस , कशी छान लढली ... जर हुशारीनं वागलो तर रेजिमेंट पूर्णत: आपल्या बाजूची होईल !

**वायनोनेन** – बोल ... बोल ... काय केलं पाहिजे ?

**कमिस्सार** – काय करायचं ? असं करायचं ... पहिली गोष्ट म्हणजे पक्षाच्या सभासदांना एकत्र बोलवायचं. नंतर, इतर गोष्टींबरोबर, त्या नायकाची आणि त्यांची ... काय त्याचं नांव ... एडक्यांसारखी टक्कर घडवायची.

**वायनोनेन** – अलेक्सेयची ?

**कमिस्सार** – आणि शेवटी – कमांडरला चाचपून पहायचं.

**वायनोनेन** – नायकाची आणि अलेक्सेयची टक्कर करायची ? योग्य होईल असं करणं ?

**कमिस्सार** – असं करणं अत्यंत आवश्यक आहे, म्हणजेच योग्य आहे.

**वायनोनेन** ( उठत ). – तर मग अशा रीतीनं सगळयाच गोष्टींचं समर्थन करता येईल ... तशा माणसाशी तू फार खोलात जाऊ नको. नाही म्हटलं तरी त्या माणसानं तुरुंगात सक्तमजुरी भोगलीय. शिवाय, तुकडीत फूट कशाला पाडायची ?

**कमिस्सार** – रेजिमेंट म्हण वायनोनेन, तुकडी नव्हे. आणि फूट नव्हे, चाळणी लावणं म्हणतात ह्याला. तुझ्या डोक्यात पक्कं भिनवून घे – पक्षाच्या शिस्तीसाठी आवश्यक ते सगळं मी करीन आणि रेजिमेंटचा निकोप हिस्सा सुरक्षित रहावा म्हणून सडक्या भागाचा नाश करण्या-सकटच्या सगळ्या गोष्टी तू पार पाडशील. समजलं ?

**वायनोनेन** ( विचारमग्न होत ). – पण हा, त्यांचा नायक ... तू त्याला पुरता ओळखत नाहीस ... तो फार ताकदीचा आहे आणि धूर्त आहे.

**कमिस्सार** – ह्याबाबत मी वाद घालत नाही.

**वायनोनेन** – आणि हा कमांडर ? त्याला गोळया घालण्यासाठी भिंतीशी उभं केलं पाहिजे. भिंत अगदी आतुर झालीय त्याला जवळ करायला ! मी त्याच्या सामानाची झडती घेईन.

**कमिस्सार** – जरा थांब. मी स्वतःच त्याचा समाचार घेईन.

**वायनोनेन** – त्याच्याकडून वदवून घे.

**कमिस्सार** – आता जा. तो एवढ्यात इथं येईल.

**वायनोनेन** – जर तो प्रतिक्रांतिकारक असेल, तर त्याला केव्हाही "निपटता" येईल. ताबडतोब थंडा करू त्याला!

**कमिस्सार** – जा म्हणून सांगितलं ना! मी निवाडा करीन.

छोटा **फिन्** जातो. त्याची वाटेत **कमांडरशी** भेट होते. कमांडरकडे तो संशयित नजरेने पाहतो.

या. तुम्ही अगदी काटेकोर वेळ पाळणारे आहात!

**कमांडर** – जुना नौदलातला गुण.

**कमिस्सार** (थट्टेने). – तुम्ही खलाशी फार विलक्षण आहात! सर्व चांगल्या सवयींचं श्रेय – अर्थातच नौदलातल्या गुणांना?

**कमांडर** (त्याच स्वरात). – सगळ्या नसल्या तरी बऱ्याचशा!

**कमिस्सार** – तुम्ही नौदलात खूप काळापासून आहात?

**कमांडर** (काहीशा उद्धटपणे). – नौदल सेवेत – आम्ही "नौदल सेवेत" म्हणतो – वीस वर्षं. वयाच्या दहाव्या वर्षापासून. जर दुसऱ्या रीतीनं मोजणी केली तर – दोनशे वर्षं.

**कमिस्सार** – दोनशे?

**कमांडर** – होय. आम्ही, आमच्या घराण्यानं, पहिल्या प्योत्रच्या काळापासून सेवा बजावलीय.

**कमिस्सार** – असं?

**कमांडर** – होय. सम्राट प्योत्र... तशी अनेक नाविक घराणी आहेत.

स्तब्धता.

**कमिस्सार** – काल तुम्ही उत्तम कामगिरी बजावलीत.

**कमांडर** – केवळ पेशाला अनुसरून वागलो, जास्त काही नाही.

( स्मित करतो. ) शिवाय, तिथं एका स्त्रीची उपस्थिती होती...

स्तब्धता.

**कमिस्सार** – तुम्ही अगदी मोकळेपणानं मला उत्तर देऊ शकाल? आमच्याबद्दल, सोविएत सत्तेबद्दल, तुमचा काय दृष्टिकोन आहे?

**कमांडर** ( शुष्क, उदास स्वरात ). – तूर्तास शांत आहे.

स्तब्धता.

पण मलाच हा प्रश्न का विचारता? सबंध वर्गांची गुपितं उघडी करण्याची तुम्हा लोकांमध्ये चतुराई आहे. एकूण ते अगदी सोपं आहे. जरा रशियन साहित्याची पानं चाळा, म्हणजे तुम्हाला सगळं दिसेल...

**कमिस्सार** – जे "डेकवर बंडाळीचा सुगावा लागताच कमरबंदातून एवढ्या झटकन पिस्तूलं उपसतात की, गुलाबी ब्रॅबान्टाईनच्या मनगट-पट्टीवरची सोनेरी दुपेडी किनार उसवते." हेच का ते साहित्य?

**कमांडर** ( अपमान झोंबून ). – गूमील्योव तुम्हाला तोंडपाठ असावा हें किती विचित्र! पण रशियन लष्करी अंमलदारांबाबत फक्त गूमील्योव-नंच लिहिलेलं नाही – लेर्मोन्तोव, तल्स्तोय यांनीही लिहिलंय.

**कमिस्सार** – लेर्मोन्तोव आणि तल्स्तोय यांना तुमच्याबद्दल फारशी आपुलकी नव्हती. त्यांना आम्ही जेवढं जमेल तेवढं आमच्यासाठी राखून ठेवणार आहोत. जाता जाता विचारायचं तर, कामगारवर्गीय कला तुम्ही जपायचा प्रयत्न कराल?

**कमांडर** – मला शंका आहे. पण, नमूद केलेला कामगारवर्ग जर दुसरं पुनरुत्थान घडवू शकेल, दुसरा इटाली आणि दुसरा तल्स्तोय निर्माण करू शकेल...

**कमिस्सार** – आम्हाला कोणत्याही दुसऱ्याची गरज नाही... आमच्या

स्वतःच्या सर्व पहिल्या गोष्टी असतील. त्यासाठी तुमच्याप्रमाणं आम्हाला दोनशे वर्षांचा काळ लागणार नाही.

**कमांडर** – कशावर तुमची भिस्त आहे – चालना दिलेल्या सामूहिक उत्पादनावर?

**कमिस्सार** – माझी भिस्त आहे प्राथमिक स्वरूपाच्या गंभीरपणावर आणि योग्यपणावर.

**कमांडर** – तुम्ही स्वतःच फार अवघड कामगिरी अंगावर ओढून घेतलीय – प्रौढांचं प्रबोधन घडवायची. मला तुमच्याबद्दल वाईट वाटतं. मलासुद्धा प्रबोधनाचं काम करावं लागलं होतं – नव्यानं भरती झालेल्या खलाशाचं! मी त्यांना समजावलं. (हातांची उपरोधिक हालचाल.) इथं धर्म आहे, इथं झार... तुमच्या-माझ्यात सांगायचं तर तो जरा मवाळ होता – आणि इथं पितृभूमी – रशिया. मग भविष्यकाळासंबंधी चार शब्द. अर्थात भविष्यकाळ नेहमी उज्ज्वल आणि तेजस्वी. हे हतभागी स्त्रिये, तुमच्या नशिबी तेच करणे आले आहे. इथं हा कार्यक्रम, इथं उज्ज्वल आणि तेजस्वी भविष्यकाळ... (फेऱ्या मारू लागतो.)

**कमिस्सार** (स्मित करीत). – जर काहीच बदललेलं नाही, तर तुम्ही एवढे चिडताय का?

**कमांडर** (कडवटपणे, वाईट भावनेने). – अखिल मानवजातीच्या कल्याणासाठी आणि सुखासाठी? माझ्यासकट आणि माझ्या कुटुंबातल्या घटकांसकट... ज्यांना तुम्ही तुमच्या मोहक सहजपणानं कुठंतरी गोळ्या घालून ठार मारलंय... जेव्हा अखिल मानवजातीचा प्रश्न आहे, तेव्हा एका माणसाकडं लक्ष द्यायचं कारण आहे का?

दूरवर कुठेतरी ॲकॉर्डियनचा आवाज – बहुधा अलेक्सेय वाज-वतोय.

मी जाऊ शकतो काय?

**कमिस्सार** ( टेलीफोन उचलत ) . – वायनोनेनला माझ्याकडं पाठवा.

**कमांडर** ( ताठ उभे रहात ) . – मी अटकेत आहे का ?

**कमिस्सार** ( किंचित सावकाशपणे ) . – तुम्ही मोकळेपणानं आणि खरं बोललात ह्याचा मला फार आनंद झालाय ! ( त्याच्यापाशी जाऊन हस्तांदोलन करते . )

**कमांडर** ( गोंधळून ) . – धन्यवाद !

कमिस्सारकडे एक दृष्टिक्षेप टाकून **कमांडर** जातो . छोटा **फिन्** प्रवेश करतो .

**वायनोनेन** – त्याच्यावर विश्वास ठेवणं शक्य नाही ना ?

**कमिस्सार** – ह्या माणसाला धक्का लावायचा नाही . समजलं ?

**वायनोनेन** – एवढ्यात त्याची पारख केलीस ? सांभाळ ...

**कमिस्सार** – मला त्याच्याबद्दल काय वाटतं, ठाऊक आहे तुला वायनोनेन ? शौर्याचा आव आणून तो स्वतःचा गोंधळ लपवू पाहतोय, त्याची धडपड चाललीय, पण तो आपली सेवा करील . परदेशी सद्‌गृहस्थांना तो विकला जाणार नाही .

**वायनोनेन** – मला नीटसं समजत नाही ... तुझी चूक तर होत नाही ?

**कमिस्सार** – कोणत्याही परिस्थितीत तीन अराजकवाद्यांविरुद्ध त्याच्यावर भिस्त ठेवायला हरकत नाही . आणि काही अंशी ते त्रिकूट सध्या त्याच्याविरुद्ध आहे, जर त्यानं काही गडबड करायचा प्रयत्न केलाच तर ... समजलं ?

**वायनोनेन** – फारसं नाही . मला रशियन चांगलं बोलता येत नाही .

**कमिस्सार** ( आवाज चढवून ) . – तू बंद कर आता " नीट समजत नाही , चांगलं बोलता येत नाही , " नाहीतर ... ( एक कटाक्ष . )

**वायनोनेन** ( संतापून ) . – तू आज काय ओळीनं परीक्षा घेते आहेस आणि धडे शिकवते आहेस ? ( क्षणभर गप्प होतो, मग स्मित

करतो. ) हे छान ... 'शिक्षण म्हणजे प्रकाश आणि ... अज्ञान म्हणजे ... काय बरं ... अंधार!' रशियनमध्ये अशी म्हण आहे ना?

**कमिस्सार** – जवळजवळ तशाच अर्थाची आहे, वायनोनेन. तुला रशियन म्हणीसुद्धा ठाऊक आहेत? अलेक्सेयला बोलावलंस?

**वायनोनेन** – होय, बोलावलंय. तो पहा ... ( ॲकॉर्डियनचा आवाज येतो त्या दिशेने मानेने खूण. )

**कमिस्सार** – पाठव त्याला इथं.

**फिन्** जातो आणि हाक मारतो. **अलेक्सेय** ॲकॉर्डियनसह सावकाशपणे चालत येतो. तो वेगवेगळे सूर वाजवीत मधल्या काळात बोलतो.

**अलेक्सेय** – ह्याला ॲकॉर्डियन म्हणतात. लोकवाद्य. योग्य मनःस्थिती निर्माण करायला एक दैवी वस्तू.

**कमिस्सार** – थोडं बोलायचं होतं. मी अडथळा तर आणला नाही?

**अलेक्सेय** ( बैठक मारीत ). – काही भिऊ नको, बोल! बायकांबरोबर जीवनाबद्दल बोलायला मला आवडतं!

**कमिस्सार** – सुंदर विषय. काल लढाईच्या वेळी तू कुठं भटकायला गेलास? शत्रूला फासात पकडायला गेला होतास?

**अलेक्सेय** ( गोंधळून पटकन उभा राहतो ). – मी ... मी ...

**कमिस्सार** – किंवा तुला वर्गीय द्वेषाचा एवढा जबरदस्त झटका आला, की श्वेतरक्षकांकडं बघण्याचीसुद्धा तुझी इच्छा नव्हती? काय? चक्क त्याला पाठ दाखवून मागं फिरलास?

**अलेक्सेय** – होय, माझ्या हातून चुकलं थोडं ... काहीवेळा म्हातारीचासुद्धा पाय घसरतो!

**कमिस्सार** – म्हातारीच्या गोष्टी पुरे! ( त्याच्याजवळ जात. ) थोडी चर्चा करू. तुझी माहिती सांग. तू कुठला?

**अलेक्सेय** ( सावरतो, उपहासाने बोलू लागतो ) . – अस्सं ! कुठला ? कुणापैकी ? कनिष्ठ मध्यमवर्गातला . कामकरी मध्यमवर्गीय . माझ्या हातावर घट्टासुद्धा आहे – पहा . पासपोर्टनुसार मध्यमवर्गीय आणि वृत्तीनं-सुद्धा . आणि माझे विचार अग्राह्य – सरकारीदृष्टचा !

**कमिस्सार** – अस्सं ! अपवादात्मक व्यक्ती ! अराजकवादी ?

**अलेक्सेय** – काहीसा ... हो ... आणखी कसं स्पष्ट करू ? स्वत:साठी लढतो, कारण मी कामकरी मध्यमवर्गीय आहे . बाकीच्या सहकारी रशियन नागरिकांबद्दल मला फारशी माया वाटत नाही . त्यांच्याविषयी माझ्या भावना थंड आहेत . पण तुम्हाला बहुधा काही कामगारवर्गीय सहानुभूती आणि एकता आवडली असती . आणि कमिस्सार ह्या नात्यानं, तुमच्या बोलण्यावर आक्षेप घेणारे माझ्यासारखे लोकसुद्धा तुम्हाला नकोसे असतील ना ?

**कमिस्सार** – का बरं ? खूप माणसं आक्षेप घेतात ... तू प्रयत्न करून बघ .

**अलेक्सेय** – हं ... तिथं श्वेतरक्षक आक्षेप घेताहेत . एन्टॉन्ट आक्षेप घेतेय ! फार प्रचंड शक्ती आहे . रशिया त्यांना चोपतोय . त्यांना तडे जाताहेत .

स्तब्धता .

**कमिस्सार** – एक प्रश्न : निवडणुकांमध्ये कोणत्या राजकीय संघटनेला तू मत दिलंस ?

स्तब्धता .

**अलेक्सेय** ( थोडा गप्प राहून ) . – तुम्हाला . यादी क्रमांक पाचसाठी. कोणत्याही परिस्थितीत इतरांपेक्षा तुम्ही थोडे जास्त बरे . अर्थात अजून तुमच्यावर लक्ष ठेवलं पाहिजे .

**कमिस्सार** – ठेवा ! तुम्ही नेहमी अशा नखरेल भाषेत चर्चा करता कॉम्रेड ? छाप पाडण्यासाठी ?

**अलेक्सेय** – मला काय ठाऊक ! तुम्हीच ठरवा ! ( कमिस्सारकडे रोखून पाहतो. तो गंभीर आहे अथवा थट्टा करतोय हे समजत नाही. ॲकॉर्डियनवर नाजुक, करुण स्वर काढतो. )

**कमिस्सार** – हा नवा कमांडर कसा आहे ? संशयास्पद वाटतो ना ?

**अलेक्सेय** – त्या उच्चकुलीनाबरोबर तू जरा सांभाळून रहा. माझ्या तो चांगला आठवणीत आहे.

**कमिस्सार** – आणि तो तुझी आठवण ठेवून आहे. आणि नायकाबाबत तुझं काय मत ?

**अलेक्सेय** ( वाजविणे थांबवून ). – नायकाचं काय झालं ?

**कमिस्सार** – तुम्हा दोघांची मैत्री आहे ?

**अलेक्सेय** – माहीत नाही. तसं सांगणं अवघड. कालेदिनविरुद्ध लढायला एकत्र गेलो होतो. मैत्री तशी आहे म्हणायची ...

**कमिस्सार** – मला तसंच वाटलं होतं. तो तुला घट्ट मुठीत ठेवून आहे.

**अलेक्सेय** ( कमिस्सारकडे कटाक्ष टाकून ). – मला ? त्या राक्षसाला मी घाबरतो ?

**कमिस्सार** – होय, तू त्याला घाबरतोस ... होय ... तुम्हाला सुव्यवस्था हवीय !

**अलेक्सेय** ( एकदम उठत ). – सुव्यवस्था ? शब्द पाठ केलास ? आता अखंड त्याचा वापर कर: "सुव्यवस्था"! लोकांना जुन्या "व्यवस्थे" नंतर स्वातंत्र्य अनुभवायची इच्छा आहे. निदान स्वातंत्र्यासमान काहीतरी. पार इथपर्यंत ( गळ्यापर्यंत हात करतो ) गिळलीय त्यांनी ती व्यवस्था !.. पाच वर्षं, दहा वर्षं ... बोलायचं कसं हेसुद्धा विसरले !

**कमिस्सार** – पण तू नाही विसरलेला !

**अलेक्सेय** ( स्मित करतो ) . – खरंच, नाही विसरलो ! प्रत्येकापाठी त्याचा पुनरुच्चार करतो : "जेव्हा खाजगी मालकी असणार नाही… तेव्हा सगळं अद्भुत होईल…" होईल, परत "होईल"!.. आपल्यात जुन्या सवयी मुरून बसल्यात. आपल्या किंचित फायद्याचं कुठं गवसेल याचाच केवळ शोध घेतोय. ओरबाडून घ्यायला टपलोय. झोपेतसुद्धा आपल्या चिंध्या उराशी बाळगून धरतो ! माझं ॲकॉर्डियन, माझे कपडे, माझी बायको… बटव्यासाठी माणसाचा त्यांनी जीव घेतला. ते पुरेसं झालं नाही म्हणून म्हातारीचाही जीव घेतला ! माणूस कधी सुधारील स्वतःला ? स्वतःच्या जुन्या सवयी मोडील ? किती छोटा शब्द ! "माझं" ! ! ह्या शब्दावरून घसरून न पडण्याची त्यानं खबरदारी घेतली पाहिजे. नाहीतर प्रचंड काही घडेल ! ( स्वतःची कॉलर खेचतो. )

**कमिस्सार** – हळू ! गणवेष फाडशील ! तुला वाटतं की, आम्हाला हे दिसत नाही ? आंधळे आहोत ? आम्ही लोकांवर विश्वास टाकतो.

**अलेक्सेय** – शेतगडी प्रतिसाद देणार नाही.

**कमिस्सार** – देईल ! तुझ्यासारखे काही तत्त्वज्ञानी तिथं त्या खेड्यां-मध्येही बसलेले आहेत. आणि "नायका" सारखेही. ते म्हणतात : "आमचे आम्ही जगू… बाकीचं गेलं खड्ड्यात… शेतकऱ्याचं स्वातंत्र्य"… पण प्रत्यक्षात ते काय करू शकतात भावी आर्थिक… तुला हा शब्द समजतो ?

अलेक्सेय मान डोलावतो.

… देशाच्या आर्थिक गरजा भागवण्यासाठी ? बोल ?

**अलेक्सेय** – मला काय माहीत ?

**कमिस्सार** – शेतकरी कुणावर विसंबू शकेल ? उदारमतवाद्यांवर, कॅडेटांवर ? त्यांनी विकलं शेतकऱ्याला… अगदी कवडीमोलानं विकलं ! चार दूमा झाल्या, चार वेळा तिला विकलं ! समाजवादी क्रांतिकारकांवर ?

जमिनीबद्दल बोलताना जांभया द्यायचे... आणि युद्धावर शेतकऱ्याला पिटाळलं... खंदकात लोटलं... आता परकी भांडवलाची चाकरी करायला धावलेत!

**अलेक्सेय** (उदासपणे). – होय, धावलेत.

**कमिस्सार** – मग उरलं कोण? आँ?

अलेक्सेय गप्प.

बोल... बोल ना... वाद घालायचा म्हटलं तर! गप्प राहतोस? उत्तर दे: त्याला, शेतकऱ्याला, खरी शांतता प्रत्यक्षात कुणी मिळवून दिली? पश्चिमेत अजून युद्धाच्या, खालसाकरणाच्या वल्गना चालू आहेत. कुणी शेतकऱ्याला जमिनीबद्दल सांगितलं आणि त्याला जमीन दिली? आं? वस्तुस्थिती खोटी असल्याचं सिद्ध कर! तू म्हणतोस – शेतकरी प्रतिसाद देणार नाही? देईल... अर्थात ताबडतोब नाही हे समजण्यासारखं आहे. आम्ही त्याला अवधी देऊ. "बैस, थांब, विचार कर"... अर्थव्यवस्थेला वर उचलू. रशियाला प्रकाशात, मोकळ्या हवेत घेऊन जाऊ. माणसांना मोकळेपणी श्वास घेऊं दे! आणि मग तुझा शेतगडी आपोआप आमच्या पाठी येईल. तो चतुर आहे. म्हणेल "तुमच्यात मी कणभर वाटेकरी होऊ का?"

**अलेक्सेय** (थट्टेने, पण सखोलतेने). – वाटेकरी बनायला तो नक्की येईल!

कमिस्सार – बरोब्बर... तू अपवादात्मक माणूस आहेस, पण तुझ्या डोक्यात कचरा फार!

**अलेक्सेय** (धूर्तपणे). – कदाचित मी मुद्दाम वटवट करतोय?

कमिस्सार ताठ उभी राहते. ती भक्कम निकोप स्त्री आहे.

मी तुझ्यावर नजर टाकतो, तू आपल्या तत्त्वांना तावातावानं मांडत

वगैरे असतेस आणि मी – ... कबूल करायला शरमत नाही ... माझ्या मनात येत असतं : अशी छान बाई माझी का बरं नाही होत ? तू निघून जा , नाहीतर ...

**कमिस्सार** – परत लग्नात रस वाटायला लागलाय ?

**अलेक्सेय** – सोडून दे तो विषय . मी तुला गाठीन . माझे गुप्त विचार आता तुला सांगतो . ( तिच्याजवळ जातो . ) हं , ऐक !

**कमिस्सार** ( ग्लासात पाणी ओतत ) . – घे , पाणी पी !

**अलेक्सेय** ( वोदका प्यायल्याप्रमाणे एका घोटात पाणी पितो ) . – कदाचित मी मुद्दाम वटवट केली असेन ? काय ? तुझी कसोटी बघतोय .

**कमांडर** आणि **तांडेल** दारापाशी दिसतात . ते क्षणभर थबकतात , मग कमांडर निर्धाराने पुढे येतो . अलेक्सेय गर्रकन मागे वळतो आणि कमांडरला पाहताच डोळे किलकिले करून चिडविण्याच्या उद्देशाने , अपमानकारक रीतीने ॲकॉर्डियनवर ' चिझिक ' वाजवू लागतो .

**कमांडर** ( संतापून ) . – चूप रहा ! ऐक !

अलेक्सेय तसाच पुढे वाजवीत राहतो . कमिस्सार त्याला थांबविते . एकदम शांतता पसरते .

( कमांडर वाचतो . ) "लष्करी सेवेत एकता आणि अधिकारी व्यक्तीच्या पूर्ण आज्ञेत राहणे आवश्यक आहे . रेजिमेंटमध्ये निर्माण झालेल्या अनेक अधिकारी व्यक्तींचे अस्तित्व इतःपर सहन केले जाणार नाही ..."

**कमिस्सार** – तुम्हाला काय पाहिजे ?

**कमांडर** – पूर्ण अधिकार .

अलेक्सेय शीळ वाजवतो . कमिस्सार ताठ होते .

**कमिस्सार** – पूर्ण अधिकार ? आणि तुम्ही वाचून का दाखवता ?

हा कसलातरी सार्वत्रिक दस्तऐवज आहे का ?

**कमांडर** – मी वाचतोय, कारण कामाच्या बाबी संदिग्धपणं बोलायला नाविक दलात आम्हाला शिकवलं नाही. नोकरीत सेवा करायची असते, तिच्याबाबत बडबड नव्हे! जरी आता बकबक करणं शहाणपणाचं मानलं जातंय! (अलेक्सेयकडे मानेने निर्देश करतो.)

**अलेक्सेय** (त्याच्या अंगावर धावून जात). – मी तुला दाखवतो बडबडीचा हिसका, पांढऱ्या गळ्याच्या!

क्षणभर त्याची नजर नकळतपणे कमांडरच्या शुभ्र कॉलरवर खिळते. तेवढ्यात **नायक** नेहमीच्या पद्धतीने प्रवेश करतो. त्याच्या जोडीने **घोगरा** आहे. तो काहीशा संयमाने निवेदन करू लागतो.

**घोगरा** – तुकडीत ...

**कमिस्सार** – रेजिमेंटमध्ये.

**घोगरा** – कशात ते महत्त्वाचं नाही – काय ते महत्त्वाचं आहे ... ज्यांच्यावर कसलाही कलंक नाही आणि लढायांमध्ये ऑफिसरांचा ज्यांनी खुर्दा केलाय, अशा क्रांतिकारक खलाशांमध्ये काही झारचे हस्तक उगवलेत. (तो कमांडरकडे पाहतो, मग तांडेलाकडे.) रक्तपिपासू! बांडगूळं! त्यांचे धंदे तुकडीला समजलेत ... आम्ही पुरते जागरूक आहोत. (कमिस्सारला.) तर कॉम्रेड, उशीर होण्यापूर्वीच तुकडीचा ह्या संसर्गापासून बचाव केला पाहिजे. इथं आमची स्वत:ची भावना होती – क्रांतीचा अपमान करण्यासारखं तिच्यात काही नव्हतं – निकोप भावना होती ...

**कमांडर** – निकोप? तुम्ही तर सिफीलिसवाले!

**घोगरा** – माझ्यासारखा सिफीलिसवाला निकोप प्रतिक्रांतिकारकापेक्षा कदाचित जास्त चांगला असेल? (एका हाताची मूठ दुसऱ्या हाताच्या तळव्यावर आपटत.) उत्तर दे कमिस्सार, उत्तर दे!

**कमिस्सार** – मी ...

**कमांडर** – उत्तर द्या, कमिस्सार!

**अलेक्सेय** – लौकर दे उत्तर!

**नायक** – कुणाची बाजू घेणार?

**कमिस्सार** ( किंचित थांबून ). – रेजिमेंटची.

**घोगरा** – वचन देतेस?

**कमिस्सार** – अस्सल कम्युनिस्टाचं वचन!

**नायक** – सर्वांसमोर ह्याचा परत उच्चार करावा लागेल. ( कमांडरच्या हातून कागद हिसकावून घेतो व चुरगळून खाली फेकतो. कमिस्सारला उद्देशून. ) मी तुला माझा कागद पाठवतो. त्याच्यावर सही कर! ( कमांडर आणि तांडेलाकडे कटाक्ष फेकत घोगऱ्याला उद्देशून ). ह्यांच्यावर नजर ठेव! त्यांचं काय करायचं त्याबद्दल नंतर सूचना देईन.

सर्व जातात. **घोगरा कमांडरपाठी** जातो. कमिस्सार एकटी राहते.

**कमिस्सार** – असं आहे तर!

**वायनोनेन** ( प्रवेश करीत ). – मामला वाईट बनलाय, कमिस्सार.

**कमिस्सार** – आपल्या माणसांना बोलाव, वायनोनेन.

**वायनोनेन** ( स्वत:शी ). – हा कमांडर ... खानदानी रक्ताचा आहे ...

**कमिस्सार** – आपल्या माणसांना बोलाव, वायनोनेन, पक्षाच्या बैठकीसाठी.

**वायनोनेन** – नायकाविरुद्ध? लढाई सुरू करायची?

छोटा **फिन्** पटकन जातो.

**कमिस्सार** ( भोवती पहात ). – अस्सं... अशा रीतीनं अनुभव गोळा करायचा, कॉम्रेड कमिस्सार.

एकापाठोपाठ एक प्रवेश करतात : **म्हातारा खलाशी** , **देवीचे वणवाला** , आणखी **काही लोक** .

**म्हातारा खलाशी** – काय आहे , कमिस्सार ?
**कमिस्सार** – काय घडतंय त्याबद्दल ऐकलंत ?
**म्हातारा खलाशी** – होय , कानांवर आलंय .
**कमिस्सार** – कमांडरबद्दल काय मत आहे ?
**देवीचे वणवाला** – नीच आहे ...
**वायनोनेन** – मी आधीच बोललोय , भिंत त्याच्या भेटीसाठी रडतेय ...
**कमिस्सार** – तू जरा गप्प बसशील ?
**वायनोनेन** ( मागे वळत ) . – मी इथून निघूनसुद्धा जाऊ शकतो .
**कमिस्सार** – काय म्हटलं मी ?

छोटा फिन् बसतो . बाकीचेही बसतात .

**देवीचे वणवाला** – मुख्य कामाचं बोलू . कुणाचा खुर्दा करायचाय ?

**कमिस्सार** – आम्हाला बातमी समजलीय की , नायकानं अराजकवाद्यांची ताजी कुमक मागवलीय . कोणत्याही क्षणी ते लोक इथं पोचतील ... दुसऱ्या परिस्थितीत ह्या नायकाशी चार शब्द बोलून , त्याला गोडीगुलाबी लावून आपल्या बाजूला वळवून घेता आलं असतं ... पूर्वीचा चांगला लढवय्या आहे ... पण आता अवघड पेचात सापडलोय आपण ! त्याच्यासारख्यांना " सुशिक्षित " करायला सवड नाही !

**देवीचे वणवाला** – त्या सर्वांना चिरडून टाकलं पाहिजे ...

**कमिस्सार** – " सर्वांना " म्हणजे कुणाला ?

**अलेक्सेय** येतो. शांतता.

**अलेक्सेय** – काय शिजवताय? मी परका वाटतो का? (आंबट चेहरा करून अॅकॉर्डियनवर 'याब्लोचको' चे करुण स्वर वाजवीत जातो.)

**म्हातारा खलाशी** (अलेक्सेय गेला त्या दिशेने पहात). – एकाकी आहे पोरगा!

**एक खलाशी** – तो स्वतःच जबाबदार!

**वायनोनेन** – मी त्या कमांडरबद्दल आणखी थोडं बोलू का?

**कमिस्सार** – त्या कमांडरचा अगदी ध्यास घेतला आहेस तू! आपल्याला विचार करायचाय पक्षाच्या संघटनेबद्दल, त्या कमांडरबद्दल नव्हे. इथं आपण फार काळ मागं गप्प बसून राहिलोय!

**देवीचे वणवाला** – आपण मूठभर लोक! कितीसे?

**वायनोनेन** – कितीसे? अर्धं जग समोर, सबंध जग पाठी आणि कॉम्रेड लेनिन मध्यभागी. तुला एवढे पुरेसे नाहीत?

**देवीचे वणवाला** – मी जाऊन त्यांच्याशी "बोलू"? (हाती पिस्तूल धरून दाराकडे जाऊ लागतो.)

**घोगरा** प्रवेश करतो. देवीचे वणवाला थांबतो.

**घोगरा** (सर्वांना न्याहाळत). – तुकडीच्या प्रमुखानं हुकूम दिलाय घाई करायचा... (कमिस्सारला.) हा पहा हुकूम, त्याच्यावर सही कर बघू. बघतेस काय? हे त्या कमांडरबद्दल... त्याला दूखोनिनच्या ठाण्यावर पाठवायचंय... होय... दुसऱ्या जगात! (कमिस्सारच्या हाती कागद देतो. इतरांना उद्देशून.) आणि तुम्ही सर्वांपासून वेगळे का बसलाय? मंडळी, एकत्र असणं चांगलं... (कम्युनिस्टांच्या थंड नजरा पाहून.) बरं, आटपा लौकर... (जातो.)

**कमिस्सार** (नायकाचा हुकूम वाचते. कागदाची घडी घालते

आणि कागद फाडून टाकते.) .—स्वतःच्या प्राणांची आहुती द्यायला कोण तयार आहे?

शांतता.

**वायनोनेन** — कशासाठी?

**कमिस्सार** — हा प्रश्न पक्षाला आपण नेहमीच विचारतो असं नाही. (इतरांना.) तर मग?

लोकांमध्ये खळबळ.

**म्हातारा खलाशी** (उठत).—मी.

**कमिस्सार** — पीटरबुर्गचा?

**म्हातारा खलाशी** — होय.

**कमिस्सार** — आपण इथं नीट घडी घालणार आहोत... तसं करणं आवश्यक आहे. (म्हाताऱ्या खलाशाला.) तू इतरांपेक्षा जास्त भक्कम दिसतोस. रेजिमेंटसमोर तू बोलायचं. जर त्यांनी तुला ठार मारलं, तर पुढं येऊन बोलायचं (सर्वांना न्याहाळत) वायनोनेननं...

**वायनोनेन** — जसा हुकूम. पण कशाबद्दल बोलायचं? तू सूचना दे.

**कमिस्सार** — अस्सं! कागदावर लिहून दिलं तरच तुला कृती करता येते? परिस्थिती ओळखून नाही वागता येत? समजलं?

**देवीचे वणवाला** — न समजण्यासारखं काय आहे? ह्याला ठार करतील, दुसऱ्याला ठार करतील, पण तू स्वतः काय करणार आहेस?

**कमिस्सार** — मी? मीच तर सुरुवात करणार आहे, कॉम्रेडहो.

**रेजिमेंटचे कनिष्ठ अधिकारी** प्रेक्षकांसमोर उभे राहतात.

**दुसरा कनिष्ठ अधिकारी**– मॉस्को. हुकूम क्रमांक एक हजार दोनशे-पन्नास: "जर पार्तीझानांच्या* तुकडीने आज्ञा पाळण्यास नकार दिला, ती बेशिस्त अथवा लहरी वागू लागली, किंवा नियमित लष्करात दंगा माजवण्याचा प्रयत्न करू लागली, तर त्या तुकडीला निष्ठुरपणे शासन करण्यात यावे. अशा प्रसंगी आपल्या लष्करी ठाण्याने काटेकोरपणे आणि अचूकपणे वेळीच प्रहार करावा. अत्यंत कमी अवधीत, चोवीस तासांच्या आत, नि:शस्त्रीकरण आणि खालसाकरण अंमलात आणावे."

**पहिला कनिष्ठ अधिकारी** – होय, हे बरोबर आहे, पण रेजिमेंटमध्ये आपले, खरोखर विश्वसनीय असे पक्षाचे लोक किती आहेत? फक्त सहा किंवा सात? त्यांना पटापट गोळ्या घालतील.

**दुसरा कनिष्ठ अधिकारी** –कोणत्याही परिस्थितीत नि:स्वार्थपणं आणि ठामपणं वागून वैयक्तिक पक्षीय आदर्श घालून द्यायचा, शक्य ते सर्व करायचं आणि सबबी सांगायच्या नाहीत, हे कमिस्सारचं आणि कम्युनिस्टांचं कर्तव्य आहे.

**नायक, घोगरा आणि त्यांचे अनेक सहकारी.** नायक स्वत:शी गेंगाण्या सुरात शोकगीत गुणगुणतोय: "धोक्याचे मेघ आमच्यावर दाटताहेत..." घोगरा बंदूक स्वच्छ करतोय व चाप ओढून पाहतोय. थंड, बोलके अनेक खटके...

**नायक** – दारू प्यायची का?

**घोगरा** – मला प्रकृती सांभाळली पाहिजे.

**नायक** – पोकळपणा, भोवती सगळा पोकळपणा... छातीतली जळ-

---

* पार्तीझान – गनिमी सैनिक.

जळ अगदी घशात जाणवतेय ... देव नाही, माणसं नाहीत. (स्वतःच्या लोकांना उद्देशून.) ही काय माणसं आहेत? काहीच नाही!

**घोगरा** – पण आपल्यापाशी किती नामी बाई आहे! हा सगळा गोंधळ संपला म्हणजे हिच्यासारख्या एखादीबरोबर मी लग्न करणार!

**नायक** – हा-हा! तिच्याबरोबर सगळ्या पापांची फेड करणार! त्या पोराच्या आणि म्हातारीच्या खुनांची? अ – राजक ...

> **एक खलाशी** येऊन नायकाला सांगतो: "आम्ही दोन कैदी आणलेत." नायक खूण करतो: "त्यांना आत आणा." **दोन कैद्यांना** आणतात. **खलाशी** त्यांच्याभोवती गोळा होतात. कैदी सभोवार पाहतात. त्यांना सहानुभूती आढळत नाही.

**घोगरा** – तुम्ही कोण?

**पहिला कैदी** – माणूस

**घोगरा** – म्हणा – मर्त्य आहात!

**पहिला कैदी** – तुमच्यासारखाच!

**घोगरा** – काय सांगायचंय?

**पहिला कैदी** – मी आणि माझा मित्र ...

**घोगरा** – फक्त स्वतःबद्दल.

**पहिला कैदी** – मी परत बोलतो: मी आणि माझा मित्र श्लेसविग-मधल्या जर्मन युद्धकैदी छावणीतून आलो आहोत. सबंध पोलंड आणि छोटा रशिया आम्ही पार केला ...

**घोगरा** – युक्रेन!

**पहिला कैदी** – आम्हाला घरी जायचंय. आमचे कागदपत्र तुमच्या माणसांपाशी आहेत. (पहारेकऱ्यांकडे खूण करतो. कागदपत्र प्रथम घोगऱ्याच्या हाती देण्यात येतात. नंतर तो नायकाला देतो.)

**नायक** – कोणता हुद्दा?

**पहिला कैदी** – आम्ही दोघंही ऑफिसर.

गोळा झालेल्या खलाशांमधून उद्‌गार : "आहा !"

**घोगरा** – रशियातल्या घडामोडींची तुम्हाला माहिती आहे ?

**पहिला ऑफिसर** – सगळ्या जगाला आहे तशीच. तुम्ही आमच्याकडं अशा दुष्टपणानं का पाहताय ? माझी इस्टेट नाही. आजकाल हीच गोष्ट लोकांना सर्वांत जास्त आवडत नाही असं दिसतंय. मला सार्वत्रिक लष्करी भरतीत बोलावून घेण्यात आलं होतं.

**नायक** – पुढं.

**पहिला ऑफिसर** – मला वाटलं ... मला काही सुचत नाही ... तिथं मी खूप खूप विचार केला होता ... मी बोलू शकतो का ?

एक खलाशी थेट ऑफिसरपाशी येऊन उभा राहतो.

माझ्याकडं हे लोक असं चमत्कारिक पाहताहेत ... नका, अशा नजरेनं बघू नका ! मी बोलू का ?

**घोगरा** – बोला.

खलाशी बसतो.

**पहिला ऑफिसर** – मला वाटलं की, आपली रशियन क्रांती तेजस्वी असेल, माणसावर प्रेम करणारी ... इथं, आपल्या रशियात, जिथं आम्ही अखेरीस परतलो आहोत, मानवतेचा पहिला किरण उजळलाय ... होय ना ? मानवता ...

**नायक** (उर्मटपणे). – पण मी हा शब्द विसरलोय ... आणि तूही विसरून जा !

**पहिला ऑफिसर** – "विसरायचा" म्हणजे ? नाही, नाही ... तुमची

चूक होतेय ... मानवता सर्वत्र असली पाहिजे ... मला बोलणं अवघड जातंय ... माझ्याकडं अशा विचित्र नजरांनी पाहताहेत ... तरीही मी बोलतोच ! मला बोलणं आवश्यक आहे ... मी ... तुम्ही स्वतः युद्धामधून गेला आहात ... जुन्या राजवटीत लष्करी सेवा बजावलीय ... आम्हाला मानवतेनं वागवा, आमच्यावर विश्वास टाका, खुल्या मनानं वागा ... तुम्ही तसं कराल अशी माझी खात्री आहे.

**घोगरा** – किती गोड भ्रम !

काही लोक हसतात.

**पहिला ऑफिसर** – आम्ही ... सामान्य ऑफिसर ... खंदकात लढलेले. सोविएत सत्तेचा अर्थ समजून घ्यायची आमची इच्छा आहे.

**नायक** – पुरे झाली वटवट. तर्कशास्त्रावर येऊ. त्या विषयाचा कधी अभ्यास केलाय ?

**पहिला ऑफिसर** – होय.

**नायक** – हा गप्प का बसलाय ? ( दुसऱ्या ऑफिसरकडे बोट दाखवतो. )

**पहिला ऑफिसर** – तो बहिरा झालाय. स्फोटाच्या धक्क्यानं.

खलाशी त्याच्याकडे पाहतात. काहींच्या मुद्रा बदलतात.

**नायक** – तर तुम्ही युद्धकैद्यांच्या छावणीतून आलेले ऑफिसर आहात? घरी जाताय ?

**पहिला ऑफिसर** – हो.

**नायक** ( दुसऱ्याला ). – आणि तुम्ही ?

दुसरा ऑफिसर गोंधळून स्मित करतो. पहिला त्याला "हो" अशी खूण करतो, तेव्हा तो मान डोलावून होकार दर्शवितो.

अस्सं! ह्यातून पुढं असं घडणार ... : तुम्ही घरी जाल आणि श्वेतरक्षकांना सामील होणार काय?

**पहिला ऑफिसर** – आम्ही कुणालाही सामील होणार नाही. कुठंही जाणार नाही!

**नायक** – तुम्ही स्वतः सामील झाला नाहीत, तर तुम्हाला जबरीनं सामील व्हायला लावतील. ही सरकारी यंत्रणा तुम्हाला पुरेशी ठाऊक असली पाहिजे. तर्कशास्त्राला धरून आहे?

**पहिला ऑफिसर** – पण हा बहिरा आहे आणि मी ... (गळ्यात अडकवलेला स्वतःचा जखमी हात दाखवतो.) शिवाय आम्ही श्वेतरक्षकांना कशाला जाऊन मिळू?.. माणसं तुम्हालाही येऊन मिळताहेत. (जमावात उभ्या असलेल्या कमांडरकडे मानेने खूण करतो.)

**नायक** – आमच्याकडं? तुम्हाला आमच्याकडं प्रवेश नाही. आमच्यात हा तसला एकच प्रतिनिधी आहे (एका खलाशाच्या पहाऱ्यात असलेल्या कमांडरकडे नजर टाकतो.) आणि त्यालाही आम्ही लौकरच निरोप देऊ.

काहीजण कमांडरकडे पाहतात.

पुढं. तुमचा सगळा वंश मुळांपासून निपटून टाकला पाहिजे. नाही तर आम्ही क्रांती गमावू. तर्कशास्त्राला धरून आहे?

सर्व गप्प.

**दुसरा ऑफिसर** (अनपेक्षितपणे). – त्यांनी आपल्याला घरी जायला परवानगी दिली?

**पहिला ऑफिसर** (निराशेपायी अश्रू ढाळीत). – आणखी एक मिनिट ... माझी फार इच्छा होती ... तिथं आम्ही वाचलं होतं ... नव्या

रशियाबद्दल, लेनिनबद्दल... अशा क्रूरपणानं तुम्ही का वागताय?

**नायक** – क्रूरपणा... हा-हा! जगात माझ्यासारखा आणि ह्याच्या-सारखा (घोगऱ्याकडे बोट दाखवीत) प्रेमळ दुसरा कुणी भेटणार नाही!

**पहिला ऑफिसर** – शेवटचं बोलतो... तुमच्या पाया पडतो... मला बोलायला परवानगी द्या.

**नायक** – भांडवलदारी कोर्टामधली ढोंगी रीत! लोकांना फसवण्या-साठी. इथं तिची गरज नाही. (आपल्या माणसांना उद्देशून.) त्यांना घेऊन जा – "डावीकडं"!

**पहिला ऑफिसर** (ताठ उभे रहात). – ठीक आहे... मी आपली रजा घेतो... मरणापूर्वीच्या भाषणाबद्दल अत्यंत आभारी आहे.

**दुसरा ऑफिसर** (पहिल्याला). – त्यानं दिली परवानगी घरी जायला? तू गप्प का?

**नायक** – घेऊन जा त्यांना!

**दुसरा ऑफिसर** – त्यानं घरी जायला परवानगी दिली? (नाय-काला.) तुम्ही परवानगी दिलीत? होय? धन्यवाद... माझी घरी वाट पाहताहेत.

**म्हातारा खलाशी** (रेजिमेंटसमोर येत). – त्यांना कशाबद्दल ठार मारताय?

लोकांची हालचाल.

**आवाज** – त्यांना धक्का लावू नका.

**अलेक्सेय** (नायकापाशी जातो आणि पहिल्या ऑफिसरकडे बोट दाखवून). – मला हा माणूस आवडला!

**नायक** – त्यांना घेऊन जा!

**अलेक्सेय** – त्यांना हात लावू नका!

**नायक** ( जमावात घुसून पाठीने ऑफिसरांना मागे रेटत ). – कुणी अडथळा करील तर त्यांनाही घेऊन जा !

**पहारेकरी ऑफिसरांना** नेतात.

**अलेक्सेय** ( नायकाला ). – सांभाळ !

**कमिस्सार**, छोटा **फिन्**, **देवीचे वणवाला** आणि आणखी **दोघे** प्रवेश करतात.

**नायक** – हुकूमावर सही केलीत ?
**कमिस्सार** ( किंचित थांबून ). – हो ...
**नायक** – दे कागद.
**अलेक्सेय** – ते पाहिलंस ?
**कमिस्सार** – काय ? काय घडलं ?
**घोगरा** – तो बेचैन झालाय. इथं दोघांचा निकाल लावतोय.
**म्हातारा खलाशी** – युद्धकैदी.
**अलेक्सेय** – आणि स्वत:ला कमिस्सार म्हणवून घेतेस !
**कमिस्सार** – थांबवा !

रेजिमेंटच्या भवितव्याचा निर्णायक क्षण. कमिस्सार सर्व गोष्टींचा अंदाज घेते: स्वत:च्या आणि पक्षीय कॉम्रेडांच्या भवितव्याचा, रेजिमेंटच्या भवितव्याचा. अलेक्सेय, म्हातारा खलाशी, वायनोनेन आणि इतर अनेक ऑफिसरांचा वध थांबवायला धावतात. आरोळ्या – "थांबा ... गोळ्या झाडू नका !" काही क्षण तीव्र ताणाचे. बंदुकीचे दोन बार वाजतात. शांतता.

( नायकाला . ) युद्धकैद्यांना लाल सेनेत ठार मारत नाहीत. तुम्हाला हे माहीत होतं ?

**नायक** – निष्कारण मऊपणा दाखवता . प्रत्येकानं दोनपैकी कुठल्यातरी एका बाजूला असलं पाहिजे .

**कमिस्सार** – ते आपल्या बाजूला येण्याची शक्यता होती. तशी माणसं नक्की आपल्याकडं येतील. लाल सेनेत एव्हाना बावीस हजार ऑफिसर सामील झालेत .

**नायक** – बावीस हजार फितूर !

त्याचे डोळे कमांडरला शोधतात. इतर काहींच्या नजराही कमांडरकडे वळतात. तो थंड नजरेने उलट पाहतो .

**कमिस्सार** – लेनिन म्हणतात ...

**नायक** – मला त्यात रस नाही .

**म्हातारा खलाशी** – पण सोविएत सत्तेच्या आदेशांबाबत तुम्ही आस्था दाखवली पाहिजे .

**नायक** – असं ? मला माझ्या स्वत:च्या पुरेशा आहेत .

नायकाचा हुकूम अंमलात आणलेले **पहारेकरी** परततात .

**पहारेकरी** ( हळू आवाजात ) . – तिथं त्यांच्यातला एकजण ओरडला: " क्रांतीचा विजय असो ! "

**नायक** – त्यात काय विशेष ? खोटं बोलला . घाबरला .

**अलेक्सेय** ( संतापून ) . – आणि तसं नसेल तर ?

**कमिस्सार** ( अलेक्सेयला आणि इतर अनेकांना थोपवून ) . – ह्या सर्व गोष्टींची शांतपणं चर्चा करू ...

**घोगरा** – मला असली विचारी माणसं आवडतात. बसा .

**नायक** – बोलू या . मी लोकांचं ऐकून घ्यायला नेहमी तयार असतो .

प्रत्येकजण आपापली सोयीची जागा निवडून बसतो.

हं, बोला.

लोक अपेक्षेने गप्प राहतात. एकमेकांकडे नजरा टाकतात.

**आवाज** – इथं काय बोलणार!

**कमिस्सार** (नायकाला). – तुमच्या वरिष्ठतेचा इथं एवढा मान राखतात, की तुमच्या निर्णयावर आक्षेप घेण्याची कुणी हिंमत करत नाही.

**म्हातारा खलाशी** (उठून पुढे येत). – कोण म्हणतो हिंमत नाही?

**अलेक्सेय** (म्हाताऱ्या खलाशाला मागे सारून पुढे येत). – कुणाच्या वरिष्ठपणाबद्दल बोलताय? (नायकाकडे.) ह्याच्या? कुणावर वरिष्ठपणा गाजवतो हा? आमच्यावर? (नायकाला उद्देशून.) आम्हाला बोलायला "परवानगी दिलीस"? ऐकायची इच्छा आहे तुझी? तुझ्याभोवती माणसं फारच गप्प आहेत ना? (अपमानकारक नक्कल करीत.) "कशाबद्दल गोंगाट?"

**नायक** (घोगऱ्याला). – ह्याची प्रकृती बिघडली.

**अलेक्सेय** (घोगऱ्याकडे बोट दाखवीत). – तो आजारी आहे. सिफीलिसवाला आणि तुझा हस्तक. मी चक्क तुझ्या थोबाडावर सांगतो: तू फितूर आणि विश्वासघातकी आहेस!

**नायक** – तुला कुणी शिकवलं असं बोलायला? (कमिस्सार, म्हातारा खलाशी आणि वायनोनेनकडे शोधक नजरेने पाहतो.)

**म्हातारा खलाशी** (नायकाला). – बघ, बघ, डोळे फाडून बघ, सत्तालोलुप नीचा! आम्हीसुद्धा केव्हापासून तुझ्यावर लक्ष ठेवून आहोत!

**नायक** – अस्सं ...

**वायनोनेन** (सावधपणे गप्प बसलेल्या खलाशांच्या गटाकडे जात). – स्वतःला नौदल सैनिक म्हणवता!.. गप्प का बसलात? (संतापाने थुंकतो.)

गटाची अपमानीत प्रतिक्रिया.

**गटामधून आवाज** – होय. आम्ही नौदल सैनिक आहोत!

**देवीचे वणवाला** – कुणाला इथं घाणीत खेचू बघताहेत? आम्हाला?

**आवाज** – आम्ही पीटरबुर्गचे! आम्ही कुणाला भितो? ह्याला? (नायकाच्या दिशेने खूण.)

**अलेक्सेय** (नायकाला). – एका बटव्यासाठी त्या पोराचा वध केलात, तेव्हा प्रत्येकाचं मत काय होतं ह्याची तू फिकीर केलीस? स्वतःच निर्णय घेतलास... पिसाटासारखा! विचारलंस कुणाला?

**आवाज** – नाही.

नायक स्तब्ध बसतो.

**अलेक्सेय** – म्हातारीचा वध केलास तेव्हा प्रत्येकाचं मत तू विचारलं होतंस?

**आवाज** – नाही.

**अलेक्सेय** – पुढं. (कमिस्सारकडे बोट दाखवून.) हिला धक्का लावू नको, असं तुला सांगितलं होतं, तेव्हा तू लोकांची इच्छा ध्यानात घेतलीस?

**आवाज** – नाही.

**तांडेल** (कमांडरकडे). – त्यांच्याबद्दल काय? माझ्या स्वतःबद्दल तर बोलतच नाही.

**अलेक्सेय** – आणि त्यांच्याबद्दल. (कमांडरकडे बोट दाखवून.) आपण त्याला कायमचा निरोप देतोय असं तू जाहीर केलंस, त्यापूर्वी कमिस्सारची आणि इतरांची संमती घेतलीस? आणि त्या दोन अपंगांना आत्ता कशाबद्दल ठार मारलंस?

लोकांचा गोंगाट.

**नायक** – बेशिस्तपणा बंद करा! तुम्हाला संपूर्ण माहिती नाही. (उठतो.) कट उघडकीला आलाय. तपशील आत्ता जाहीर होईल. कमिस्सार, वाच.

नायक कमिस्सारशेजारी आत्मविश्वासाने उभा राहतो. सर्व ध्यान एकवटतात. आश्चर्याचा भाव.

**कमिस्सार** (प्रत्यक्ष स्थळी मनाशी मजकूर जुळवून वाचण्याचा आविर्भाव करीत): "कामगारवर्गीय क्रांतीच्या नांवाने, रेजिमेंटच्या कमिस्सारचा आणि त्यानं नेमलेल्या लोकांचा समावेश असलेलं लष्करी न्यायालय ..."

**घोगरा** – कोणती नेमलेली माणसं?

**म्हातारा खलाशी** – मधे बोलू नको!

**कमिस्सार** – "... यांनी पूर्ण चौकशी करून निर्णय घेतलाय की, माजी

लोक कमांडरकडे पाहतात.

तुकडीप्रमुखांनी

लोकांमध्ये खळबळ.

खटला न भरता अथवा चौकशी न करता रेजिमेंटमधील माणसांचा वध केल्याबद्दल, तसेच, एका अज्ञात महिला नागरिकाचा व दोन युद्धकैद्यांचा वध केल्याबद्दल, त्याचप्रमाणे कमिस्सारच्या, सोविएत सत्तेच्या प्रतिनिधीच्या, आज्ञा पाळण्यास नकार दिल्याबद्दल, त्यांना दोषी ठरविण्यात येत आहे. आणि जाहीर करण्यात येत आहे की, सदरहू प्रमुखांना सर्वोच्च शिक्षा देण्यात यावी ..."

हा हुकूम वाचून दाखविला जात असताना घोगरा लोकांच्या मुद्रा न्याहाळतो व हळूच नायकापासून दूर जातो. तो नायकाचा विश्वासघात करतोय.

**नायक** ( मॉसर पिस्तूल उपसत ).—विश्वासघात! माझ्यापाठी या!

सहा खलाशी नायकावर तुटून पडतात. तो त्याना बाजूला सारतो. पण त्याच्या हातातील पिस्तूल हिसकावून घेण्यात येते.

( नायक घोगऱ्याला उद्देशून. ) तू कुठं चाललास?

**घोगरा** ( अलेक्सेयच्या घट्ट मिठीत ). — मी ... मी ... त्यानं मला जबरीनं त्या गोष्टी करायला लावल्या!

**नायक** — तिनं तिथं काय लिहिलंय ते वाचा! तिनं जो मजकूर वाचला तो तिथं लिहिलेला नाही ... विश्वासघात!

शांतता. कमिस्सार कोरा कागद हातात फडकावते. अलेक्सेय तिच्याकडे पाहतो, कागद घेतो, उलटसुलट फिरवतो आणि निर्णय घेतो.

**अलेक्सेय** — जे वाचण्यात आलं होतं, तेच लिहिलंय! तूच संमती दिली होतीस: सर्वमत ऐकायला! ( घोगऱ्याला स्वत:बरोबर फरफटत नेत नायकापाशी जातो. ) आता बोल, पूर्वी काय म्हणायचास तू?

**घोगरा** ( नायकाच्या तोंडावर ) : शिक्षा अंतिम आहे आणि तिच्या-वर अपील नाही!

**अलेक्सेय** ( कमिस्सारला आणि इतरांना ) — बरोबर?

**कमिस्सार** — बरोबर.

**वायनोनेन** ( बंदुकीत काडतूस भरीत ). – मी अंमलात आणू ?

**कमिस्सार** – मला वाटतं की, कॉम्रेड अलेक्सेय सर्व व्यवस्था पाहू शकतील.

अलेक्सेय चकित होऊन मागे वळतो.

**नायक** ( सहा खलाशांच्या पकडीतून सुटण्याचा प्रयत्न करीत ). – मला शेवटचं बोलू द्या ! अलेक्सेय, बंधो ! आल्योशा ...

**अलेक्सेय** ( पुढे येतो आणि सहा खलाशांच्या हातून नायकाला मुक्त करतो ) – शेवटचं बोलणं ? ही भांडवलदारी कोर्टामधली ढोंगी रीत ! लोकांना फसवण्यासाठी ! तिची गरज नाही ! ( पिस्तूल बाहेर काढतो. ) चला !

**नायक** – क्रांतीचा विजय असो !

**अलेक्सेय** ( नायकाच्या खांद्याला धक्का मारीत ). – पुरे झालं ढोंग !

**अलेक्सेय नायकाला** घेऊन जातो. खलाशी वाट पाहतात. पिस्तूलाचा बार वाजतो.

**तांडेल** – देवा, तुझ्या गुलामाच्या आत्म्याचा स्वीकार कर !

**वायनोनेन** ( विचारमग्न कमिस्सारला उद्देशून ). – ए, तू परत कसल्या विचारात पडलीस ? खरंच, असा विचार कर-करून तुझं डोकं फुटेल !

**कमिस्सार** – तुला काय करायच्यात नसत्या पंचायती, वायनोनेन ? ( कमांडरला. ) कॉम्रेड कमांडर, आपण मुक्त आहात. आपल्या कामाला आरंभ करा.

**कमांडर** ( ताठ उभे रहात ). – जशी आज्ञा !

अनपेक्षितपणे कुठूनतरी गाण्याचा आवाज जवळ जवळ येऊ लागतो. आवाज – "अराजकवाद्यांची कुमक!" गोंगाट करीत आणि सवयीनुसार बेबंदपणे **खलाशांचा नवा गट** प्रवेशतो. त्यांची सामग्री त्यांच्या खांद्यावर निष्काळजीपणे लटकावलेली.

**अराजकवाद्यांच्या कुमकेचा पुढारी** – तुकडीतल्या कॉम्रेडहो, राम-राम! अराजकवाद्यांना सलाम! भले जमलेत इथं एकेक! रंगेल रात्री गाजवायला! आणि आमच्या लाडक्या नायकाला पाठिंबा द्यायला! (स्त्रीकडे आणि कमांडरकडे लक्ष जाते.) आणि ह्यांना कुठं पकडलंत? (कमिस्सारला व कमांडरला उल्हासी निष्ठुरपणे न्याहाळतो. अजून त्याला कसलाच संशय नाही.) ऑफिसर आणि त्याची बायको? काय, सापडलात तावडीत? आत्ता घेऊ तुमचा समाचार... (घोगऱ्या-ला.) ए बंधो, ठीक आहेस? नायक कुठाय? हजार वर्षांत त्याला पाहिला नाही. कशी आहे त्याची प्रकृती? त्याच्या छातीत जळजळतं अजून? आता कसा आहे?

**घोगरा** – आता त्याला जळजळत नाही.

**पुढारी** – तू गप्प गप्प का आहेस?

**कमिस्सार** – त्याला सांगा समजावून! थोडक्यात!

**घोगरा** – हं... त्याचं असं झालं... तुझ्या नायकाचा आम्ही निकाल लावला... होय, होय, गोळी घातली. महा-हलकट होता तो.

**पुढारी** – तुझा प्रगतीशील अर्धांगवायू इथपर्यंत येऊन पोचला? (त्याच्या डोक्यावर खूण करतो.)

**घोगरा** (पुढाऱ्याचा हात झटकून). – तो कुठवर पोचलाय त्याची चिंता मी करीन!

**अलेक्सेय** परततो. नायकाची टोपी, कमरपट्टा आणि पिस्तूलाची पिशवी जमिनीवर फेकतो.

( अराजकवादी पुढाऱ्याला . ) ओळखल्यास ह्या वस्तू ?

नव्या गटाचा पुढारी मान लांबवून त्या वस्तू न्याहाळतो .

**पुढारी** ( स्वतःच्या लोकांना ) . – बंधूंनो ! फितुरी !

गटामध्ये गोंधळ .

**वायनोनेन** – ए फुटीरांनो ... शांत रहा ... तुमचं दुकान बंद झालंय . आता लष्करी सेवा सुरू करा . नाही तर तुमच्या कवटयांना आम्ही भोकं पाडू .

समोर उभ्या असलेल्या संपूर्ण रेजिमेंटकडे गटातील लोक पाहतात .

**कमिस्सार** – तांडेल , त्यांचा ताबा घ्या .

**तांडेल** – जसा हुकूम . ( कुमकेला . ) एक कतारमे खडे हो जाव ! दाये मूड ! ए , उसासे टाकू नको ! दाये मूड ! हुश्शार !

गट "हुश्शार" पवित्र्यात उभा राहतो . कमिस्सार त्याच्यापाशी येते .

**कमिस्सार** – नमस्ते , कॉम्रेडहो !

**पुढारी** – रामराम .

**कमिस्सार** ( अधिक जवळ जात , कठोरपणे ) . – पुन्हा एकदा ... नीट शिका ... नमस्ते , कॉम्रेडहो .

विस्कळीत उत्तर . रेजिमेंट एकदम आक्रमक पवित्रा घेते : "काय ?"

( कमिस्सार कुमकेला उद्देशून . ) हे वाईट . पुन्हा एकदा – नमस्ते , कॉम्रेडहो !

**गट** (कुणाशी गाठ पडलीय हे उमजून, थोडया वेळानंतर). – न-म-स्ते!

**कमिस्सार** – अस्सं! नियमित लाल सेनेच्या पहिल्या नाविक रेजिमेंट-मध्ये दाखल झाल्याबद्दल मी तुमचं अभिनंदन करते!

**गट** – कामकरी जनतेची आम्ही सेवा बजावतो!

**तांडेल** – आहा, आत्ता त्यांना बरोब्बर आठवण झाली.

**कमांडर** (कमिस्सारला). – तुम्ही कमालीच्या वेगानं वागलात!

**कमिस्सार** – होय, दोनशे वर्षांपेक्षा खूपच कमी काळ लागला.

**घोगरा** (न शरमता सामील होत, कमांडरला). – होय... होय, तुम्हाला आमची ओळख होईल. तिच्यासारखे आणखी खूप कम्युनिस्ट असले तर फार बरं होईल. (कमिस्सारच्या खांद्यावर थाप मारतो.)

**तांडेल** (त्याच्याकडे पाहून). – ए, रांगेत जाऊन उभा रहा!

**कमिस्सार** – कॉम्रेडहो, कूच सुरू करा!

रेजिमेंट नीट शिस्तीत उभी राहते. तिचे प्रचंड सामर्थ्य पाहणाऱ्याला जाणवते. ती चालू लागते. तिच्यात चालीत दमदार ताल आहे.

कॉम्रेडहो, आता नियमित लाल सेनेतला पहिला "नमस्ते" म्हणा!

रेजिमेंटमधून प्रचंड प्रतिसाद घुमतो. सामर्थ्यवान सेनेची पहिली आरोळी जाणवते. ऐटीत पावले टाकीत रेजिमेंट जाते.

संधिप्रकाश. (**कमिस्सारबरोबर तांडेल**, **म्हातारा खलाशी** आणि **वायनोनेन** आहेत.

**कमिस्सार** (टेलीफोनवरील संभाषण आटोपते घेत). – हो, हो... ठीक... करा तसं... (रिसीव्हर खाली ठेवते.) तर कॉम्रेडहो, इथं तुम्ही भरपूर चर्चा केल्यात, पण पुरेशी कृती मात्र केलेली नाही. आता कृतीची वेळ झालीय. वेळ आपल्या दृष्टीनं मोलाचा आहे. वाटचालीत मी कमांडरबरोबर अनेक मुद्द्यांवर सल्लामसलत केलीय. (म्हाताऱ्या खलाशाला उद्देशून.) माझ्या प्रिय मित्रा, तू एका बटालियनचं नेतृत्व करायचं.

**म्हातारा खलाशी** – मी कसला नेता होणार? मी एक साधा बोटीच्या बंबात कोळसे मारणारा!

**कमिस्सार** – आपण सगळेच नवखे आहोत... पण आता ह्या विषयावर पुढं चर्चा नको.

**तांडेल** – जमिनीवर लढायची आम्हाला सवय नाही... नेतेपणाची तर गोष्टच सोडा! पायदळी कामाचा आम्ही नेहमी तिटकारा केला.

**कमिस्सार** – आता तसं वाटून घेणं बंद करा.

**तांडेल** – जसा हुकूम.

**कमांडर** येतो.

**कमांडर** – लष्करी महत्त्वाची बातमी आहे.

**कमिस्सार** – सांगा.

म्हाताऱ्या खलाशासमोर बोलावे अथवा न बोलावे अशा नजरेने कमांडर पाहतो.

तुम्हाला ह्या कॉम्रेडच्या उपस्थितीची अडचण होतेय? मी ओळख करून देते: आपण ज्या बटालियनबद्दल बोललो होतो, तिचे हे नवे कमांडर, तुमचे सर्वांत जवळचे मदतनीस.

हस्तांदोलने.

**वायनोनेन** – माझ्यासाठी एखादी छोटी बटालियन नाही ही फार दु:खाची बाब आहे.

**कमिस्सार** – जरा थांब – शोधू तुझ्यासाठी. प्रथम शीक. तर, बोला कॉम्रेड कमांडर.

**कमांडर** (कमिस्सारला माहिती देतो). – बातमी त्रोटक आहे, पण खूप बोलकी आहे. पश्चिम आघाडीवरून धाडलेली शत्रूची शाही पायदळ ब्रिगेड आपल्या प्रदेशात आलीय.

**तांडेल** – शाही ब्रिगेड. एकोणीसशे आठमध्ये पाहिली होती. परदेशी गेलो होतो तेव्हा.

**कमांडर** – अगदी बरोबर.

**कमिस्सार** – तुम्ही काय सुचवता, कॉम्रेड कमांडर?

वायनोनेन आणि म्हातारा खलाशी कमांडरच्या अधिक जवळ सरकतात.

**कमांडर** – माझी योजना अशी आहे. (लष्करी कारवाईचा नकाशा दाखवीत.) इथं आपण आहोत. आपणापाशी तीन बटालियन आहेत. दोन बटालियन पुढं सरकवायच्या. इथं सोयीस्कर फळ्या आहेत. एक बटालियन राखीवमध्ये ठेवायची ... तिच्याबरोबर नवा कमांडर राहील ...

मौन.

**कमिस्सार** (विचारमग्नपणे कमांडरच्या शब्दांचा पुनरुच्चार करते). – दोन बटालियन पुढं सरकवायच्या. एक बटालियन राखीव ठेवायची. सगळं बरोबर – जुन्या नियमांनुसार आणि व्यवहारानुसार. पण आपल्या परिस्थितीत असं वागणं योग्य ठरेल?

**अलेक्सेय** प्रवेश करतो.

**अलेक्सेय** (सर्वांवर नजर फिरवीत). – मी परत इथं उपरा आहे काय?

**कमिस्सार** – नाही, तू उपरा नाहीस. बैस. तिथं आपली नौदलातली मंडळी कशी आहेत?

**अलेक्सेय** – काही वाईट नाहीत, जगताहेत... हवा खाताहेत... बायकांना डोळे भरून पाहताहेत. (गंभीरपणे.) अफवा आहे की, काहीतरी घडतंय!

**कमिस्सार** – कोणत्याही अफवेशिवाय बातमी ऐक – आपल्यावर शत्रू-ची नियमित ब्रिगेड चालून येतेय.

**अलेक्सेय** (उफाळून). – चला!

**म्हातारा खलाशी** – काय चला? कसं चला? कुठं चला? (वेडा-वून.) "चला" म्हणे!

**अलेक्सेय** (बसतो). – मी काय लढाईचे डावपेच आखणारा आहे काय? (कमांडरकडे.) ह्याचं काम ते!

**कमिस्सार** – कॉम्रेड कमांडरनी स्वतःच्या सूचना एव्हाना मांडल्यात: शत्रूची वाट पहात दबा धरून बसायचं आणि मग त्याचा समाचार घ्यायचा. तुमचं काय मत आहे ह्यावर?

मला वाटतं, ही योजना आपल्या उपयोगाची नाही. (कमांडरला.) तुम्ही रागावू नका... जर एव्हाना शत्रू आपल्यावर चालून येत आहे असं माहीत आहे, तर मुळीच वाट न पाहता आपण त्याच्यावर प्रहार केला पाहिजे, तो परत उठणार नाही असा त्याच्यावर घाव घातला पाहिजे.

**अलेक्सेय** – टाळी देतो!

**तांडेल** – ही नौदलाची रीत झाली!

**कमिस्सार** – जुने रशियन डावपेच आता पुरे झाले! बारीक लांब ओळ करून चिखलात पालथं पडून रहायचं, पाठीशी थोडी राखीव फौज आणि शत्रू स्वतःच्या लहरीप्रमाणं डावी-उजवीकडून झोडपत येतोय. मी सुचवते – अर्थात तूर्तास माझं हे पूर्णतया वैयक्तिक मत आहे – शत्रूवर आपणच झडप घालायची.

**अलेक्सेय** – ओहो!

**कमिस्सार** – तुमचं काय मत?

**कमांडर** (कोरडेपणाने). – तुमची सूचना अत्यंत पुरोगामी आहे आणि मी... पण ही पक्षाच्या बाजूनं येतेय तर...

**कमिस्सार** – तर मग दुसरा मार्ग पत्करू. तुमचे हुकूम काय आहेत?

**कमांडर** – एक मिनिट... (नकाशा पहात.) हा दोन वेर्स्तांवाला? ठीक... आत्ता सांगतो... एक मिनिट... (खूण करीत.) पहिली बटालियन आहे त्याच ठिकाणी राहील आणि पाऊलभरही मागं न सरता शत्रूचा सगळा पहार स्वतःवर झेलील. बाकीच्या दोन बटालियना... दुसरी आणि तिसरी... लपतछपत पुढं जातील... सुमारे वीस वेर्स्ता चालून जातील आणि इथं एकत्ररीत्या प्रहार करतील. ह्या इथं! (नकाशावर ठिकाण दाखवितो.)

**कमिस्सार** – मोहीमेच्या नेतृत्वाला खात्रीशीर माणसं निवडली पाहिजेत.

**कमांडर** (कोरडेपणाने). – निर्विवादपणं. हे काम तुमचं!

**कमिस्सार** – मला वाटतं, त्या दोन बटालियनांबरोबर खुद्द तुम्ही जा आणि तुमच्याबरोबर तुमचा नवा मदतनीस. पहिल्या बटालियन-बरोबर... (लोकांवर नजर टाकीत) मी राहीन आणि माझ्या संगतीला तांडेल आणि अलेक्सेय.

**वायनोनेन** – आणि मी... (कमिस्सारला.) मी जातो ह्या कमांडर-बरोबर... पाठव ना मला!

**कमिस्सार** – माझ्याबरोबर येतोस, वायनोनेन?

**वायनोनेन** – जरूर.

**कमिस्सार** (वायनोनेनला). – जरा डोकावून पहा... तिथं कुणी नाही ना?

वायनोनेन दारापलिकडे डोकावतो व कुणीही नसल्याची खूण करतो.

**कमांडर** – प्रहार एकाच वेळी झाला पाहिजे. पहिली बटालियन... समोरून हल्ला चढवील. दुसरी आणि तिसरी... शत्रूच्या पिछाडीवरून हल्ला चढवतील. हल्ल्याची वेळ – पहाटे पाच वाजता. तुमची घड्याळं लावा. आत्ता साडेअकरा वाजलेत.

सगळे बटालियन-नेते घड्याळे पाहतात.

**म्हातारा खलाशी** – पाच वाजता.

**कमिस्सार** – पाच वाजता.

घड्याळे लावतात.

**कमांडर** – तपशील, वाटा आणि मोर्चाबाबतची माहिती थोड्या वेळानं मिळेल.

**कमिस्सार** – मला तुमच्या ध्यानात आणून द्यायचंय की, रेजिमेंटची ही पहिलीच गंभीर कसोटी आहे... मोहीमेबद्दल पूर्ण गुप्तता बाळगा. जर कुणी शत्रूच्या तावडीत सापडला, तर कोणत्याही परिस्थितीत तोंड उघडायचं नाही. मरण पत्करावं लागलं तरी बेहत्तर! शत्रूला अनपेक्षितपणं चकित केलं पाहिजे.

**वायनोनेन** – जसा हुकूम. पूर्ण गुप्तता बाळगू. मरेपर्यंत.

**कमिस्सार** – मग काय... रेजिमेंट कसोटीला उतरेल?

**कमांडर** – दुर्दैवानं भाकीत करण्याची देणगी माझ्या ठायी नाही. आता हालचाल सुरू करावी असा माझा सल्ला आहे. काळ भराभरा उलटतोय.

रात्रीच्या वातावरणात दूरवर हुकूमांचे आवाज आणि ताल. बटालियनांची कारवाई सुरू झाली.

**पहिला कनिष्ठ अधिकारी** – निघाले, निघाले... (कान देऊन ऐकत हळू आवाजात.) एक, दोन, तीन, चार!.. ते पहा पहिलं नियमित संचलन... ही गतिमान सेना... तिच्यातल्या प्रत्येकाला ठाऊक आहे तो कशासाठी आणि कुठं चाललाय... माझ्या काळजात रोमांचकता भरलीय!.. लाल सेने – आमचं तारुण्य तुला अर्पण! जेव्हा आम्ही अठरा वर्षांचे होतो, तेव्हा सगळ्या जगाला आम्ही सांगितलं होतं "सगळ्यांना, सगळ्यांना, सगळ्यांना!" आम्हाला आमच्या सर्व मोहीमा, आमच्या सर्व घोषणा आठवतात: "शेवटच्या भयानक घटकेला, बाल्टिक काफल्यातले खलाशी आवाज उंचावत आहेत!" आमच्या माथीच्या, पायदळ डिव्हिजनांच्या आणि घोडदळ सेनांच्या, महान

मार्गाची आम्हाला आठवण आहे. सगळं आठवतंय. जेव्हा एकजण खाली पडायचा, तेव्हा जणू स्वतःच्या शरीराचा एक लचका तुटल्यासारखं भासायचं.

**दुसरा कनिष्ठ अधिकारी** – ... आम्ही मोहीमा करत होतो. वर्षा-मागून वर्ष, रात्रंदिवस कूच करत होतो... दिवसाला सत्तर वेर्स्ता अंतर तोडत होता... सगळया नद्या आम्ही पार केल्या – विस्तूलापासून अमूरपर्यंत! सगळीकडं आम्ही आमची ठाणी वसवली.

रात्रीचे पहारेकरी आपापल्या जागा घेतात. परत रात्रीची विशाल मैदाने. वातावरणात मिठाचा, आयोडिनचा, माशांचा आणि दवण्याचा दरवळ. पहारेकरी ( **घोगरा** ) आणि त्याचा मदतनीस ( **वायनोनेन** ).

**घोगरा** – आता नीट पहा, वायनोनेन.

**वायनोनेन** – पाहतोय.

**घोगरा** – आणि पाठीशी पहा.

**वायनोनेन** – पाठीशी ?

**घोगरा** – विश्वास् कॉम्रेडचा निकाल लागला... रेजिमेंटमध्ये फितुरी झालीय!

**वायनोनेन** – तुला असं वाटतं? आं? खरंच... हा कमांडर... कसा आहे ते सैतानालाच ठाऊक! ..

**घोगरा** – त्या कमांडरला जागा देण्यासाठी कुठल्या माणसाला बळी दिला? कॉम्रेड आंधळे बनलेत, जुन्या गोष्टी विसरताहेत... ही बाईसुद्धा अशीच संपणार!

**वायनोनेन** – नाही, ती नाही संपणार! अशा गप्पा आता पुरे! आपल्याला लक्ष ठेवलं पाहिजे. कुठल्याही मिनिटाला शत्रू हल्ला चढवील.

**घोगरा** – तुला पाहिजे तेवढी नजर ठेव, पण माझे शब्द लक्षात

ठेव, माझा गळा चिरलास तरी हरकत नाही – रेजिमेंटचा आता अवतार संपला!

**वायनोनेन** – तसं होणार नाही!

**घोगरा** – चल, इथून निघून जाऊ या, वायनोनेन. स्तेपमध्ये जाऊ, दलदलीमधून जाऊ, समुद्रावर जाऊ... विश्वासू साथी शोधू. सत्याचा शोध लावू.

**वायनोनेन** – आता इथंच त्याचा शोध लावीन. उद्या आमची पक्षाची संघटना बैठक आहे. तिला पक्षाचे सभासद आणि सहानुभूतीदार येणार आहेत. हे सारं कमिस्सारमुळं! तिनं असा पक्का बंदोबस्त केलाय, की मागं फिरणं शक्य नाही.

**घोगरा** – तिथं ती काय करतेय? कशाबद्दल बैठक आहे?

**वायनोनेन** – माहीत नाही.

**घोगरा** (दातांचा करकर आवाज करीत). – तुला माहीत नाही? जुन्या कॉम्रेडवर विश्वास ठेवत नाहीस? १९०५ सालावर विश्वास नाही?

**वायनोनेन** – ए १९०५ वाल्या, गप्प बैस, नाही तर....

**घोगरा** – सिगारेट ओढायची?

सिगारेटी वळतात. घोगरा वायनोनेनच्या खांद्यावर झुकून पेटती काडी पुढे धरतो. त्या उजेडात फिन्च्या कमरपट्ट्यातील सुरा त्याला दिसतो. तो हळूच चटकन सुरा खेचून घेतो आणि वायनोनेनच्या पाठीत खुपसतो. वायनोनेन खाली कोसळतो. घोगरा आणखी वार करतो.

(वायनोनेनच्या देहावर बसून.) कुणावर मात करू पाहताय? स्वतंत्र भूमीवर जोवर निदान एक स्वतंत्र मालक शिल्लक असेल, तोवर आम्ही तुम्हाला चिरडू... (बोटांनी सुऱ्याचे पाते पुसतो.)

घोगरा तेथून जायला निघतो, पण क्षणभर मागे वळून पाहतो.

मग परत येऊन मृत देहाला उचलून बसवतो. **देह खाली कोसळतो** त्याचे डोके दगडांवर आपटते. घोगरा **चिकाटीनं त्याला परत** उचलून बसता करतो. समाधान झाल्यावर **तो बंदूक उचलतो**, काडतूसे तपासतो आणि जायला निघतो. त्याची **प्रत्येक हालचाल** त्याच्या मनातील विचार व्यक्त करते – हा विचार **तो भकास** चेहऱ्याने मोठ्यांदा उच्चारतो.

अराजक चिरायू होवो!

मृत देह हळूहळू ताठर बनतो. घोगरा गेला त्या दिशेने कुणाची-तरी घुसमटलेली किंचाळी. सरपटत येणाऱ्या माणसांच्या हाल-चाली. शिरस्त्राणवाला **एक माणूस** फिन्च्या दिशेने सावधपणे सरकतो. अंधारात तो मृत देहावर जोरात प्रहार करतो. त्याचे हात देहाला चाचपतात आणि तो चकितपणे पाहतो. **आणखी काही माणसे** सरपटत येतात. पहारेकरी मेलेला आहे आणि ह्या खिंडारातून सैनिकांची साखळी गुपचूप वेगाने पुढे घुसते. दूरवर आरोळ्यांचे आणि गोळीबारांचे आवाज होतात. मग इशारा देणाऱ्या आरोळ्या. शिंग वाजते आणि **अर्धवट धावते** चकित झालेल्या माणसांचा गोंधळ. ती दिसत नाहीत, पण काय घडते आहे ह्याची पूर्ण कल्पना येते. आसऱ्यासाठी धावणाऱ्या अनेक आकृती अंधारात अस्पष्ट दिसतात. त्यात **कमिस्सार** आणि **काही खलाशी** आहेत.

**कमिस्सार** – खाली पडा!

प्रकाशझोत फिरतो. पहिल्या बटालियनच्या उरलेल्या लोकांवर पहिला बार.

**अलेक्सेय** (बाराच्या दिशेने). – उगीच संबंधात ताण कशाला आणता?

**कमिस्सार** – अलेक्सेय, इकडं ये!

**अलेक्सेय** (सरपटत तिच्यापाशी जात). – काय?

**कमिस्सार** – तुझं ॲकॉर्डियन आणलंस?

**अलेक्सेय** – अर्थात.

**कमिस्सार** – तुला 'इंटरनॅशनल' माहीत आहे?

**अलेक्सेय** – नाही. मला प्रेमगीतंच जास्त माहीत. नेमकं काय पाहिजे?

**कमिस्सार** – ताबडतोब वाजवायला लाग...

**तांडेल** – त्यांचा हल्ला सुरू होतोय...!.

पहिल्या बटालियनचे उरलेले लोक जमिनीला चिकटून राहतात. घट्ट रुजून बसतात. अलेक्सेय ॲकॉर्डियनचे पहिले सूर वाजवतो.

**अलेक्सेय** – माझ्या साथींनो, ऐका माझं गीत!

शत्रूकडून गोळ्या झाडतात. अलेक्सेय साहसाने झपाटतो. सारे त्याच्याकडे लक्षपूर्वक आणि संमतीदर्शक नजरांनी पाहतात.

**तांडेल** – हल्ला सुरू होतोय!..

शत्रू पुढे घुसतो. प्रचंड गोळीबार.

**अलेक्सेय** – धीर धरा, कॉम्रेडहो! पाठ दाखवू नका! माझं पहिलं गाणं आहे – लोकप्रिय दर्यागीत 'वार्याग'...

शत्रू पुढे घुसतोय. खलाशी अखेरची काडतूसे उडवतात.

**तांडेल** – काडतूसं संपली!

**अलेक्सेय** – उठा!

खलाशी आडोशामधून बाहेर येतात. उन्मादाने बेभान बनलेला

अलेक्सेय ताठ उभा राहून त्वेषाने ॲकॉर्डियन वाजवतो. खलाशी बंदुका हातात सज्ज धरतात. अलेक्सेय आपले ॲकॉर्डियन शत्रूच्या एका सैनिकाच्या तोंडावर फेकतो, स्वतःचा सदरा फाडून घामात भिजलेले ते कापड काठीला गुंडाळतो आणि शत्रूवर चालून जातो. खलाशांची कोंडी झालीय. हाती येईल ती वस्तू उचलून ते लढतात, पण शेवटी त्यांच्यावर मात करण्यात येते आणि त्यांना फरफटत नेतात.

(एका पहारेकऱ्याला दूर ढकलून.) डोळे फाडून बघतोस काय? मला उचलून न्या, डुकरांनो, मला उचलून न्या! आम्ही तुमच्याकडं चालत येणार नाही (उपहासात्मक आव्हानाने खाली पडतो.)

**कमिस्सार** – लाल सेना हु ...

तिच्या तोंडावर हात दाबला जातो, मग बोळा कोंबतात. कमिस्सारला उत्तरादाखल बंदिवान सैनिकांकडून निरोपाचा अदम्य "हुर्रा" उमटतो. शत्रूचे सैनिक त्यांची तोंडे बंद करू पाहतात. पण त्यांच्या बोटांच्या फटींमधून "हुर्रा" वाढत्या प्रमाणात उमटतो. शांतता. **कनिष्ठ अधिकारी** येतात. एकमेकांकडे पाहतात.

**दुसरा कनिष्ठ अधिकारी** – आपले कॉम्रेड बंदिवान झाले!

**पहिला कनिष्ठ अधिकारी** (प्रेक्षकांना). – तुम्हाला काय वाटतं – त्यांचं कार्य संपलं?

**दुसरा कनिष्ठ अधिकारी** – ऐका. लढाऊ कम्युनिस्ट शेवटच्या श्वासापर्यंत झुंजत राहील. जोवर त्याचा हात चालतोय, मग तो डावा असला तरीही, तोवर तो झुंजत राहील. आणि जर त्याला हलणं अशक्य ठरलं, तर जीभ आहे. दुसऱ्या लोकांना ओरडून सांग, उत्तेजन दे, कार्याला उद्युक्त कर... बोलणं अशक्य झालं, तर खुणांनी सांग. तुला चालवत नेताना त्यांनी मारलं, तरी जिद्द सोडू नको., तुला बांधून ठेवल्यामुळं

आणि तोंडात बोळा कोंबल्यामुळं हलता येत नसेल, तर तुझा वध करणाऱ्यावर बोळा थूंक. तुझ्या मानेवर कुऱ्हाडीचा घाव बसतेवेळी, तुझ्या मरणघटिकेवेळी, क्रांतीचाच विचार कर. लक्षात ठेव, मरणं हेसुद्धा पक्षकार्य आहे.

नुकत्याच ध्वनीत झालेल्या विषयांना अनुसरून संगीत – विलक्षण उत्तेजित वातावरण, मृत्यूची अपेक्षा आणि स्वगत. मैदानावर निशा-पक्षी ओरडतात, बंदिवान खलाशी जमिनीला कवटाळून झोपलेत. **चार खलाशी** पिंजऱ्यात अडकलेल्या हिंस्र श्वापदांप्रमाणे फेऱ्या मारताहेत. **पहारेकरी** साक्षात साम्राज्याप्रमाणे भकास उभे आहेत. अलेक्सेय झोपेत परत लढतोय... तो तळमळत ओरडतो: "मला उचलून न्या, डुकरांनो, उचलून न्या!" तो जागा होतो. **कमिस्सारला** पाहतो. ती गप्प आणि अदम्यपणे बसून आहे.

**अलेक्सेय** – मी कुठं आहे? खरंच, आयुष्यात निराशेचे क्षण असतात. (कमिस्सारला.) अजून वाट पाहतेस?

**कमिस्सार** – विचार करत्येय... काय घडलं असावं? आपल्या चौकीवर पहाऱ्याला कोण होतं?

**तांडेल** – वायनोनेन.

**कमिस्सार** – वायनोनेन. काय झालं असावं त्याला?

**कुमकेचा माजी पुढारी** – कदाचित तुमचा घात केला? काय तांडेल? तुमच्यात कुणी विश्वासघातकी होता? नायकाचा निकाल लावलात, त्या कमांडरला जिवंत ठेवलात आणि झोपा काढत असताना शत्रूच्या तावडीत आता सापडलात.

**अलेक्सेय** (त्याला बाजूला ढकलत). – पुरे कर तुझी बडबड...

**ओदेस्सावाला** – शांतपणं काम कर.

**तांडेल** ( ओदेस्सावाल्याला ) . — बंड करू नको, अजून हा सरकारी प्रदेश आहे .

**ओदेस्सावाला** — ए, तू चालता हो नासक्या! ( कमिस्सारला . ) अस्सं, गप्प बसून विचार करतेय!

**कमिस्सार** — विचार करावा लागतोय ... स्वतःसाठी आणि ज्यांना विचार करता येत नाही, त्यांच्यासाठी .

**ओदेस्सावाला** — मी दावतो तुला, आम्हाला कसा विचार करता येत नाही ते!

**देवीचे वणवाला** ( ओदेस्सावाल्याला बाजूला ढकलत ) . — चूप बैस, निंदाखोरा!

**अलेक्सेय** — रेजिमेंट इथं वेळेवर येऊन पोहोचली तर किती छान होईल!

**कमिस्सार** — श्शू ...

अलेक्सेय पटकन गप्प बसतो व सभोवार पाहतो .

शांत रहा, अलेक्सेय . आपण धीर धरू .

**अलेक्सेय** — नौदलाचं पाणी दाखवायचं?

**कमिस्सार** — होय .

**तांडेल** — आपल्या लोकांना जागं करायची वेळ झाली .

**कमिस्सार** — अगदी बरोबर, तांडेल . इथंही बोटीवरची शिस्त चालू ठेवता?

**तांडेल** — होय . शिवाय शत्रू परकी पायदळ आहे . आम्ही पायदळा-कडून कधीच स्वतःला तुडवून घेणार नाही .

**कमिस्सार** — नाही घेणार तुडवून, तांडेल, नाही घेणार तुडवून! हा आपला प्रदेश आहे .

**अलेक्सेय** – होय, आपलाच आहे!

**कमिस्सार** – उठायचा इशारा द्या.

स्वतःच्या कामाची आठवण ठेवून, अलगुजाऐवजी बोटांचा वापर करून शीळ वाजवून उठण्याचा इशारा तांडेल देतो.

**तांडेल** – उठा, आता लोळू नका! कोको तयार झालाय, कोको...

मारहाण झालेली शरीरे चाळवतात. काहीजण नेहमीच्या इशाऱ्याची पुनरुक्ती करतात. धिप्पाड तरुण उठून उभे राहतात. इथेही तांडेल त्यांचे कपडे ठीकठाक करतो आणि मग कमिस्सारपाशी जाऊन वर्दी देतो: "कंपनी जागी झाली."

**कमिस्सार** – इथंसुद्धा नमस्ते, कॉम्रेडहो.

रेजिमेंटमधील उरलेले लोक हळू आवाजात, एकसुरात कमिस्सारला प्रति-अभिवादन करतात.

**ओदेस्सावाला** – हूं... तुमच्या "नमस्ते" साठी आम्ही मरायला तयार होऊ असं वाटतं काय?

**कमिस्सार** – चूप रहा! (सर्वांना उद्देशून.) रेजिमेंट इथवर येईल अथवा नाही, हे कळायला आपल्यापाशी मार्ग नाही. पण एक नक्की लक्षात ठेवा: दातांखाली जीभ घट्ट दाबून धरा. दोन बटालियना कुठं आणि कशासाठी गेल्यात याबद्दल तोंडातून ब्र काढायचा नाही.

**अलेक्सेय** – मुड्द्यागत गप्प पडायचं. समजलं?

**आवाज** – त्यांना थापा मारल्या तर? (पहारेकऱ्यांकडे खूण करतो.)

**अलेक्सेय** – तिथं कुठवर थापा मारशील? उलट तपासणीत तुला पुरता अडकवतील आणि आपण सगळेच निकालात निघू. सांगितलं तसं वागा: मुड्द्यागत गप्प रहा. सगळे एकत्र रहा. सर्वांत महत्त्वाचं... वेळ काढायचा.

**कमिस्सार** – अगदी बरोबर, अलेक्सेय.

**अलेक्सेय** – पाच वाजेपर्यंत कशा ना कशा रीतीनं काळकाढूपणा केला पाहिजे ... आणि मग ... इडापिडा टळो ... सारं सुरळीत पार पडो!

**ओदेस्सावाला** – असली भाबडी माणसं आयुष्यात प्रथमच पाहतोय ... तुम्हाला काय वाटतं? तो कमांडर आता स्वतःहून इथं मरायला येईल? (पहारेकऱ्यांकडे खूण करीत.) तुमचा तरुण कमांडर केव्हाच पसार झाला!

लोक कमिस्सारकडे पाहतात.

**आवाज** – कदाचित हा म्हणतोय ते बरोबर असेल?

**शत्रूचा अधिकारी** प्रवेश करतो. त्याच्याबरोबर **पहारेकरी**.

**अधिकारी** – आख्तुंग. (लक्ष द्या!). कोण जबानी देईल?

शांतता. निर्धाराचे मौन.

तुमची परिस्थिती तुम्हाला नीट समजलेली नाही. तुमचा सर्वनाश जवळ आलाय. जो जबानी देईल, तो स्वतःचा जीव वाचवील. बोला, कोण आहे तयार?

मौन.

ठीक आहे. आत्ता बोलतं करतो तुम्हाला!

पहारेकरी **घोगऱ्याला** आणतो. खलाशांना पाहताच घोगरा एकदम थबकतो. बंदिवानांच्या तोंडून हलकासा चीत्कार उमटतो.

**अधिकारी** – हा माणूस कोण – तुम्हाला माहीत आहे?

मिनिटं ! (अलेक्सेयला.) आपल्याला फासावर चढवतील. त्यांना काहीतरी सांगून टाकू.

**अलेक्सेय** – चूप रहा !

**आवाज** – चूप रहा !

**ओदेस्सावाला** – देवा रे देवा, वेळ कसा धावतोय ! मिनिटामागून मिनिट पसार होतंय. सारं आयुष्य आत्ता संपेल ! सेकंद पळताहेत... एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, सात, आठ, नऊ, दहा... मृत्यू, मृत्यू येतोय. (लोकांकडे पाहतो. त्याचे अंग थरथर कापतेय. अचानक तो हसू लागतो. हसण्याचा आवाज वाढतो आणि त्याच्या तोंडातून फेस येऊ लागतो. तो खाली जमिनीवर कोसळतो आणि पाठीची कमान करून आचके देऊ लागतो.)

**आवाज** – हा एकजण वेडा बनला !

**तांडेल** (ओदेस्सावाल्याला निरखून पहात). – हं, आणखी थोडं... दाखव... आणखी... चालू दे तुझं... आणखी ! इथं काही अनुभवी वेड्यांचे डॉक्टर आहेत. पंचवीस वर्षं तुझ्यासारख्यांवर उपचार केलेत.

**ओदेस्सावाला** (जणू काही घडलेच नाही अशा थाटात उठतो). – नाही जमलं... वेड्यांना ते गोळ्या घालत नाहीत. मूर्खा, माझ्याबरोबर ह्या सोंगात सामील का होत नाहीस ?

**अलेक्सेय** (ओदेस्सावाल्याची कॉलर खेचत). – एक बाई धीर धरतेय आणि तू... डुकरा... (बाजूला ढकलतो.) ह्याच्यावर नीट लक्ष ठेवा !

**अधिकारी आणि पहारेकरी** परत येतात.

**अधिकारी** – वेळ संपली. तुम्ही विचार केलात ? कोण जबानी द्यायला तयार आहे ?

खलाशी एकमेकांकडे ओझरते पाहतात. सगळे मुद्दाम खाली बसतात. अलेक्सेय खाकरतो आणि अधिकाऱ्याच्या पायांशी थुंकतो. आणखी दोन खलाशी थुंकतात. **अधिकारी** संतापून निघून जातो.

**अलेक्सेय** – बंधूंनो, मरणाला सज्ज व्हा. तांडेल, तुला काय वाटतं? कमांडर फितुरी करणार नाही? इथं तो पोहचेल?

**तांडेल** – त्याच्याबद्दल मी खात्री नाही देऊ शकत...

प्रवेशद्वारापाशी आलेल्या व्यक्तीमुळे एकदम शांतता पसरते. शत्रूसेनेतील तो **पाद्री** आहे. हा अखेरचा विधी. खलाशांवर क्रूस-चिन्हे करीत पाद्री सावकाशपणे चालत येतो.

**अलेक्सेय** – श्शू...

**पाद्री** – सर्व काही कडक लष्करी शिस्तीनं आणि मुकाटपणं करण्याची त्यांची इच्छा आहे. किती योग्य आहे त्यांचं वागणं! त्यांच्यासारख्या शूर माणसांना तुमच्यासारख्या शूरांना सांगण्यासारखं काही नाही. (तांडेलापाशी जात.) तुमचा दर्जा काय?

**तांडेल** – तांडेल.

**पाद्री** – तुमचा देवावर विश्वास आहे?

**तांडेल** – एकाच देवावर विश्वास आहे आकाशातल्या बापावर...

**पाद्री** – तुम्ही जुने लष्करी अंमलदार आहात. तुम्हाला सहज माफी मिळाली असती, तुमच्यावर विश्वास ठेवण्यात आला असता.

बंदिवान लक्ष ताणून पाहतात.

**तांडेल** – आपला अत्यंत आभारी आहे. पण तशी गरज नाही. मी शपथ घेतलीय.

**पाद्री** – पूर्वी तुम्ही स्वतःच्या सम्राटासमोरही तशी शपथ घेतली होती.

**तांडेल** – पण १९१७ च्या फेब्रुवारीत सम्राटांनी राज्यत्याग केला, त्यामुळं आम्ही त्या शपथेतून मोकळे झालो.

**पाद्री** – जशी तुमची मर्जी. मी तुम्हाला मदत करू इच्छित होतो. मी तुमचा जीव वाचवू पहात होतो, पण तुम्ही मरणाला कवटाळायला उत्सुक आहात. (अलेक्सेयपाशी जात.) सगळं कसं घडतं हे तुम्हाला माहीत आहे. पेशी कुजतात. पहिला किडा घशातून नाकात वळवळत जातो. डोळे सुकतात. सगळीकडं गप्प गप्प... तर विचार करा. कुणीही दोनदा जगत नाही. मिळालंय तेच एक आयुष्य. (अलेक्सेयला हळू आवाजात.) फक्त एक शब्द – तुम्हाला जीवदान मिळेल! स्वतःच्या चुका मान्य करा, शुद्ध व्हा आणि आम्ही तुम्हाला मदत करू.

अलेक्सेय मनाशी काहीतरी बेत रचतो आणि खेळ खेळण्याचे ठरवतो. पाद्र्याचे बोलणे ऐकून हेलावल्याचे तो ढोंग करतो. प्रार्थनेसाठी तो हात जोडतो आणि इतरांना हात जोडण्याची खूण करतो.

**अलेक्सेय** – बोला, बोला, पाद्रीबाबा, आम्हाला चार शब्द सांगा. आम्हाला हा सगळा मामला काहीच समजेनासा झालाय. फार वाईट!

अलेक्सेय हलकीशी खूण करतो आणि इतर दोन कॉम्रेड त्याला सामील होतात.

**आवाज** – होय, होय... काहीच समजत नाही... वाईट, फार वाईट... आम्ही अडाणी आहोत.

**पाद्री** (मदतीसाठी प्रार्थना करणाऱ्या काही खलाशांना पाहून). – मी तुम्हाला कशी मदत करू खलाशांनो? हेच ओठ दुसरे, साधे,

माणूसकीचे शब्द उच्चारू शकतात ... तुम्हाला आठवतात ? (आपली भूमिका हुबेहूब वठविण्याचा प्रयत्न करणाऱ्या अलेक्सेयचे सांत्वन करीत.) तुम्हाला हे सर्व शब्द माहीत आहेत. जगातल्या सगळ्या भाषांमध्ये त्यांचा सारखाच ध्वनी उमटतो.

**अलेक्सेय** – सारखाच ... सारखाच ...

**पाद्री** – माझ्या पाठोपाठ म्हणा ... "हे आमच्या आकाशामधल्या बापा ..."

**अलेक्सेय** (शेजाऱ्याला कोपराने धक्का मारीत) – म्हण, बेटचा, म्हण ... "हे आमच्या आकाशामधल्या बापा ..."

> खलाशी आटोकाटपणे ढोंग उत्तम वठवतात. दूरवर चकमकीचे पहिले बार वाजतात. खलाशी कान टवकारतात ... **पहारेकरी** इशारा द्यायला धावतो. गोळीबार अधिक जवळ आणि स्पष्ट ऐकू येतो.

**अलेक्सेय** (गुडघ्यांवरून उठतो आणि पाद्र्याची कॉलर पकडून.) लांब झगेवाल्या, पुरे झाली तुझी वटवट! (पाद्र्याला जोरात बाजूला ढकलून पुढे धावत जात.) कमिस्सारला सोडवायला चला, खलाशांनो!

> **पहारेकरी** शिस्त राखायला धावतात. पहिल्याला ताबडतोब फरफटत नेण्यात येते. प्रेक्षकांना त्याच्या टाचा ओझरत्या दिसतात. खलाशी पहारेकऱ्यांवर एकदम धावून जातात आणि त्यांना चकित करतात. अनेक गोळीबारांचे आवाज – एक खलाशी कोसळतो, मग दुसरा कोसळतो. **अलेक्सेय** आणि **दुसरे** काही साखळी तोडून जातात. अदृश्य झटापटींचे आवाज. पळून जाण्याचा प्रयत्न करणारा घोगरा नेमका खलाशांच्या झुंडीत सापडतो. मृत्यू! **पहारेकऱ्यांची** धावाधाव. अंधार. घबराट. रेजिमेंटचे ताल. **खलाशी** रक्ताळलेल्या **कमिस्सारला** उचलून आणतात. ते तिला

जमिनीवर ठेवतात. दरम्यान बटालियनचे लोक गडगडाट करणाऱ्या प्रचंड हिमानीसारखे शत्रूवर कोसळतात.

**अलेक्सेय** – शांत रहा!

दोन्ही फळयांकडील **खलाशी** धावत येतात. त्यांचे नेतृत्व **कमांडर** आणि **म्हातारा खलाशी** यांच्याकडे आहे. अलेक्सेय व तांडेल यांच्या खुणा पाहून ते आरोळ्या थांबवतात. कमिस्सारभोवती लोकांचा गराडा. सर्वत्र शांतता पसरते.

शेवटपर्यंत तिनं तोंड बंद ठेवलं. एका शब्दानं गुपित फोडलं नाही.

**कमांडर** – मोहीम फत्ते झाली. (कमिस्सारवर ओणवे होत.) माझं बोलणं तुम्हाला ऐकू येतंय?

शांतता.

**तांडेल** – जरा दहा मिनिटं आधी आला असतात...

**कमांडर** – माझ्याकडून जेवढ्या अपेक्षा होत्या, तेवढ्या सगळ्या मी पूर्ण केल्या. माझ्या ताकदीपलिकडचं मी केलं...

**अलेक्सेय** (कमिस्सारपाशी गुडघ्यांवर टेकून बसत). – लाडक्या कॉम्रेड, असं कसं झालं... अरेरे, बंधूंनो, आपण कुणाला गमावतोय!.. ऐकू येतंय तुला?

कमिस्सार क्षीणपणे मान हलवते.

आम्ही त्यांचा फडशा पाडला, त्यांना धूळ चारली, त्यांची राखरांगोळी केली! मी माझं अॅकॉर्डियन परत आणलंय!

कमिस्सार खूण करून बोलण्याची इच्छा प्रकट करते. विलक्षण शांतता पसरते.

**कमिस्सार** – क्रांतिकारक लष्करी सोविएतला कळवा की पहिली... नौदल रेजिमेंट स्थापन झालीय... तिनं शत्रूचा पाडाव केला. ( खूप कष्टाने बोलते. )

शांतता. प्रत्येकजण दुःखाने चूर होऊन स्तब्ध उभा राहतो.

एवढं शांत का? ( जवळ येणाऱ्या मृत्यूच्या धुकट नजरेने कमांडर, तांडेल, म्हातारा खलाशी व मोडके ॲकॉर्डियन घेऊन उभ्या असलेल्या अलेक्सेयकडे पाहते. ) अलेक्सेय... ॲकॉर्डियन परत आणलंस?

**अलेक्सेय** – आणलं परत, कमिस्सार. हे बघ माझं जिवलग!

दुःखाच्या आवेगात आणि स्फूर्ती येऊन अलेक्सेय सावकाशपणे एक जुनी सुरावट, अविस्मरणीय १९०५ मधील सुरावट, वाजवू लागतो. कमिस्सारशेजारी खलाशी उभे. अलेक्सेय तंद्रीत वाजवीत राहतो. संगीत हळूहळू विरू लागते. जेमतेम शुद्धीवर असलेली कमिस्सार कॉम्रेडांकडे वरती नजर टाकते.

**कमिस्सार** ( शेवटचा श्वास घेत ). – नौदलाचं पाणी त्यांना दाखवा...

संगीत पूर्ण विरले. नाहीसे झाले. कमिस्सार मेली. रेजिमेंटचे लोक डोक्यावरील टोप्या काढून उभे, खलाशी स्नायू ताणून ताठ उभे. धैर्य पराकोटीचे. त्यांच्या डोळ्यांमध्ये सूर्याचे प्रतिबिंब. बोटींची मुलामेदार नांवे चमकतात. संगीताची ललकारी शांततेचा भंग करते. रेजिमेंटचे ताल! ते लढाईची हाक देताहेत. त्यांच्यातून सामर्थ्य उमटतेय. ते सुस्पष्ट आहेत, त्यांच्यात काहीही डळमळीत-पणा नाही. ही तीव्र, कंपायमान इच्छा आहे. मैदानांमधल्या, आल्पमधल्या, पीरेनीमधल्या सहा तोफांच्या तोफखान्यांच्या गड-गडाटांनी तिला पाठिंबा दिलाय. सर्व जिवंत आहे. सकाळच्या उन्हात धुळीचे कण चमकताहेत. असंख्य जीव जिवंत आहेत.

सर्वत्र हालचाल आहे, सळसळ आहे, स्पंदन आहे, अक्षय जीवनाची थरथर आहे. मृत्यूच्या भयाबाबतच्या जुन्या खोटेपणाबद्दल तिट-कारा बाळगणाऱ्या माणसांना जग जन्माला घालते आहे हे दृश्य पाहून हृदय आनंदाने उचंबळते. धमन्यांचे स्पंदन. प्रकाशात न्हाणाऱ्या महानद्यांच्या प्रवाहांप्रमाणे, निसर्गातील महाप्रचंड शक्तीं-प्रमाणे, त्यांच्या वाढत्या सामर्थ्याने भेदरवून सोडत, सर्व प्रकारच्या आवाजांचा कल्लोळ उसळतो... विशुद्ध संगीताचे, रानवट, ओबडधोबड ध्वनींचे प्रचंड कल्लोळ उमटतात – प्रलयांचे आणि जीवनाच्या महापूरांचे घनगंभीर गडगडाट होतात.

तावरीया, उन्हाळा, १९३२ साल.
मॉस्को, ऑक्टोबर, १९३३ साल.

‘रादुगा’ प्रकाशन

सोविएत संघात मुद्रित

**गोर्की मा. ‘साहित्य आणि कला’**

सामान्य कामकरी वर्गाचे प्रतिनिधीलेखक माक्सिम गोर्की (१८६८–१९३६) यांचे साहित्यावरील ऋण फार मोठे आहे. केवळ रशियन, सोविएत साहित्यक्षेत्रातच नव्हे, तर जागतिक साहित्यक्षेत्रात त्यांच्या विचाराचा खोल ठसा उमटला आहे. प्रकाशक, तत्त्वज्ञानी व साहित्याचा टीकाकार या नात्याने गोर्की यांनी रशियामध्ये रशियन क्रांतिकारी लोकशाही परंपरा चालू ठेवली व तिचा पुरस्कार केला.

प्रस्तुत संग्रहात रशियन-सोविएत लेखकांना उद्देशून लिहिलेले लेख, नव्याने आकाराला येत असलेल्या सोविएत साहित्यास, तरुण लेखकांच्या मार्गदर्शनास, तसेच आंतरराष्ट्रीय पातळीवरील काही ज्वलंत प्रश्नांना वाहिलेले लेख समाविष्ट करण्यात आले आहेत.

रशियन-सोविएत साहित्यामध्ये रस घेणाऱ्या वाचकांनी जरूर वाचले पाहिजे असे हे पुस्तक आहे.

‘ रादुगा ’ प्रकाशन

सोविएत संघात मुद्रित

**आरोन का. ‘ माणूस चढला आकाशात ’**

प्रस्तुत कथेत लेखक कार्ल आरोन यांनी अग्निबाण व आधुनिक शक्तिशाली जेट विमाने यांची जन्मकथा सांगितली आहे अवकाशात उड्डाण करण्याची सुरुवात माणसाने अत्यंत प्राथमिक स्वरूपाच्या पंखांच्या साहाय्यानं केली ही कथा मुलांना गुंग करणारी आहे.

एरिक बेन्यामिन्सोन व बरीस किश्तिमोव या चित्रकारांनी ही कथा चित्रांनी सजविली आहे.

माननीय वाचक !

प्रस्तुत पुस्तकाबाबतची आपली मते आणि सूचना जाणून घेण्यास आम्हाला आनंद वाटेल.

रशियन आणि सोविएत साहित्याचे तुमच्या मातृभाषे-तील अनुवाद आमच्या लोकांच्या संस्कृतीची व जीवनाची सखोल ओळख करून घेण्यास आपल्याला मदत करतील अशी आशा आहे.

आमचा पत्ता: 'रादुगा' प्रकाशन, १७ झूबोवस्की
बुलवार, मॉस्को ११९०२१, सोविएत संघ.



व्सेवोलोद विश्नेवस्की ( १९००-१९५१ ) – एक सुप्रसिद्ध सोविएत नाटककार आणि सार्वजनिक कार्यकर्ते. त्यांनी तीन युद्धांमध्ये भाग घेतला. पहिल्या जागतिक युद्धावेळी, अजून पोरवयात असतानाच, ते युद्धआघाडीवर पळून गेले, पलटणीत दाखल झाले, त्यांना सैनिकाची सर्वोच्च बहुमानाची पदके मिळाली. महान ऑक्टोबर क्रांतीनंतर विश्नेवस्की आरमारी सेवेत दाखल झाले. पुढे लष्करी पेशा सोडून ते लेखक बनले. आणि महान पितृभूमीरक्षक युद्धावेळी (१९४१-१९४५) ते युद्ध-वार्ताहर बनले, त्यांनी युद्धाचे वृत्तांत लिहिले.

'आशावादी शोकांतिका' नाटकातील घटना १९१७ सालातील ऑक्टोबर क्रांतीनंतरच्या अवघ्या काही महिन्यांच्या अवधीनंतर घडतात. नाटकातील मुख्य घटनेसाठी विश्नेवस्कींनी विपरीत वाटणारा, अगदी असंभाव्य प्रसंग निवडला: अराजकवाद्यांचे वर्चस्व असलेल्या खलाशांच्या पलटणीचा कमिस्सार म्हणून, राजकीय नेता म्हणून, एका महिलेची नेमणूक होते. सर्व नाविक परंपरांना झुगारून नाटककार तिला युद्धनौकेवर दाखवितो, जेथे बाईला वाट बंद असते हे सर्वांना विदित आहे. पण ही घटना काल्पनिक नव्हे. क्रांतीमध्ये असे प्रसंग घडले होते. कमिस्सारची व्यक्तिरेखा ज्यांच्यावर आधारली असावी अशांपैकी लारीसा रेयस्नेर एक होत्या. पीटरबुर्गच्या प्राध्यापकाची ही मुलगी लेखिका होती, आरमारी अधिकाऱ्यांची कमिस्सार होती; क्रांतिकारक खलाशांचे तिने नेतृत्व केले.

अशा असाधारण घटनेमधून लेखक विचाराचे सर्वविजिगीषु बळ दाखवतो, जो विचार क्रांतीला खलाशांपर्यंत, अखिल जनतेपर्यंत, नेतो.